# १. गजमुखचरित्र.

( वीरेश्वरकृत. )

गौरीतनूज, गणनायक, विघ्नहर्ता,
जो दीनरक्षक सदा दनुजप्रहर्ता, ।
आधीं नरास्य, मग जो गजवक्र जाला,
तो चिंतितां परिहरी भवभीतिजाला. ॥ १

पूर्वीं गजासुर तपें करुनी, विधींतें
संतोषवोनि हृदयीं, करुणानिधींतें, ।
त्याच्या वरें सुरनरांसि अवध्य जाला.
पीडी बळें मग जगीं सकळ प्रजाला. ॥ २

जयाचा असे धाक इंद्रादि लेखां, । तया मानवांचा, वदा, काय लेखा? ।
महीपाल दुर्गीं, अरण्यीं दडाले. । जगीं धर्म सारे जनाचे बुडाले. ॥ ३

चिंताग्रस्त समस्त देव मिळुनी, कैलासपृथ्वीधरा
वेगें येउनि, आदरें विनविती वंदोनि गंगाधरा. ।
" स्वामी, दुष्ट गजासुर क्षितितळीं राहोनि सर्वामरां,
या मर्त्यांप्रति पीडितो निशिदिनीं; त्या संहरीं पामरा." ॥ ४

परिसुनि सुखाणी, त्या शिलादात्मजातें
पुरहर तंव बोले, " शूर भृत्यव्रजातें ।
झडकरि मिळवीं, गा, आजि युद्धासि जाया.
रिपुसि वधुनि रक्षूं सर्व देवद्विजां या ". ॥ ५

होतां आज्ञा, नंदी धाडुनि दूतांसि तो महानंदी, ।
आणवि पारिषदांतें. जाणवि ईशासि, वंदुनि पदांतें. ॥ ६

तें देवांसि पिनाकी सांगे, " सानंद जा तुम्ही नाकीं; ।
राहा. मी वैरींतें पाववितों आजि अंतकपुरीतें. " ॥ ७.

देउनि निरोप अमरां उठिला तो ईश जावया समरा. ।
त्या जगदवलंबातें दे नंदी निजकरावलंबातें. ॥ ८

बाहेरि येतां मग वेदवेद्यें, । भूतीं तदा त्राहटिलीं सुवाद्यें. ।

देवा तया वंदुनि सर्व सेना । चाले पुढें, जीस सिमा असेना. ॥ ९
सालंकार वृषावरी वळँघला तो शत्रुहंता भला.
कोटिरादिविभूषणीं, सुवसनीं अत्यंत पैं शोभला. । 
छत्रें पांडुर, चामरें धरुनियां हातीं तया शंकरा
सेवी भाविक भृत्य वृंद, निकटीं ठाकोनि, सौख्याकरा. ॥ १०
तो महेश सितशैलनिभातें । चालवी दडदडा वृषभातें. ।
' आजि दैत्य अवघेचि वधावे ' । यापरी वदत सैन्यहि धांवे. ॥ ११
ऐसा रुद्र ससैन्य दैत्यनगरापाशीं त्वरें पातला.
प्राकारासहि धीरभृत्यनिकरीं वेढा बरा घातला. ।
वार्ता ऐकुनियां गजासुर महाकोपें रथीं वैसुनी,
सेनेसीं सह तो निघे लगबगें युद्धा पुरापासुनी. ॥ १२
तेव्हां दोनि दळें परस्पर बळें तीक्ष्णायुधीं ताडिती.
कोपें हाणुनि वज्रमुष्टि हृदयीं क्षोणीतळीं पाडिती. ।
होतां युद्ध असें मुहूर्तभरि तें दैतेय कीं भागले,
प्राणातें मुकले, कितेक नगरा धाकें पळों लागले. ॥ १३
येवोनि सन्मुख सकोप गजासुरानें
ईशाप्रति प्रहरिलें हृदयीं शरानें. ।
तो देवही स्वविशिखीं दनुजेश्वरातें
ताडी, नभीं उडवि सारथिच्या शिरातें. ॥ १४
दोघे यापरि झुंजतां रणतटीं, पाहोनि संधि, क्षणें
दैत्याचें शिर अर्धचंद्रविशिखें तें छेदिलें तीक्ष्णें. ।
देवीं स्वर्द्रुमपुष्पवृष्टि करुनी, ठाकोनियां अंबरीं,
आनंदें नतिपूर्वक स्तुति भली केली प्रभूची बरी. ॥ १५
दानवकलेवरातें टाकुनि, देवत्व पावुनि, हरातें ।
वंदुनि, गज तो मानी बोले, बैसोनि सादर विमानीं. ॥ १६
" स्वामी, मज माराया केलें येणें परंतु ताराया ।
तें जालें, जी, दैवें. आतां मद्वाक्य ऐकिजे देवें. ॥ १७
माझें शिर हें कामा येइल, ऐसें करीं विजितकामा. ।

पूर्ण करीं तर्षातें. तेणें पावेन फार हर्षातें. " ॥ १८
तें शिर घे शिव हातीं तोषुनि; कौतुक सुरासुर पहाती. ।
तो गज, नमुनि पदातें, गेला सानंद निर्जरपदातें. ॥ १९
अभिलाष दानवाचा पुरवुनि तोषं, समस्त देवांचा, ।
दावुनि चित्र विलासा, चालियला तो महेश कैलासा. ॥ २०
तेथें हैमवती सखीप्रति वदे, " मी नाहतें, सुंदरी.
आणीं तैल सुगंध, पुरुष पहा कोण्ही नसे मंदिरीं." ।
ऐसें ऐकुनि वाक्य, ते झडकरी माखी वयस्या भली.
तें लावी तनुतें हळेदचि कसा; तेणें सती शोभली. ॥ २१
अंगावरील मळ काढुनि पार्वतीनें
केला बरा पुरुषदेह चमत्कृतीनें. ।
प्राणादिकां प्रगटवोनि निजप्रभावें,
स्नेहें तयासि कथिलें मग पुत्रभावें. ॥ २२
" गेले युद्धासि सारे प्रमथ; तरिच तूं जाउनी द्वारदेशा,
तेथें राहीं, न सोडीं परपुरुषगणा, मानुनी मन्निदेशा. " ।
मातेची मात ऐशी परिसुनि, मग तो घेउनी दृढ हस्तीं,
आला बाह्यांगणातें डुलत, मदभरें जेंवि आरण्य हस्ती. ॥ २३
गृहारामवापीजलामाजि काळीं । करी स्नान वीतांशुका, त्याच काळीं ।
महादेव तो पावला मंदिरातें. । निरोधी गणाधीश त्या ईश्वरातें. ॥ २४
रोषावेशें पाहुनी अर्भकातें, । तीक्ष्णें खड्गें छेदुनी मस्तकातें, ।
येता जाला शीघ्र अंतःपुरातें, । गेले सारे लोकही मंदिरातें. ॥ २५
भार्येतें न विलोकुनी स्वसदनीं, तो तेथुनी येकला
आरामाप्रति येउनी, लगबगें वापीतटीं ठाकला. ।
त्यातें पाहुनि, लाजुनी गिरिसुता तें त्या जळीं बैसली.
झाला आड कळोनि भाव; मग ते अत्यंत उल्हासली. ॥ २६
नेसोनि वस्त्र, मग ते गिरिशोपकंठीं
येवोनियां, विनवि वंदुनि कंचुकं ।

"ऐसा विनोद मज काय तुम्हीं करावा ?
बालापरी कपटभावहि कां धरावा ? ॥ २७
असो हें. तुतें माझिया बाळकानें । कसें सोडिलें, द्वारसंरक्षकानें ? ।
तनूच्या मळें निर्मिला जो स्वहातें, । दिली शक्तिही ज्यासि रक्षूं गृहातें."॥२८
" तेणें फाराचि निंदुनि अडविलें मातें, मदें मोहुनी;
तेव्हां म्यां असिनें तयासि वधिलें उन्मत्तशा पाहुनी. ।
येथें मी मग पावलों, गिरिसुते. त्या अर्भका या क्षणीं,
पाहें, जीववितों. जगीं प्रथित तो होईल सल्लक्षणीं." ॥ २९
होतें जें गजदैत्यमस्तक तया कंठावरी लावुनी,
हातें स्पर्शुनि तच्छरीर गिरिशें, स्वापत्यसें भावुनी, ।
कारुण्यें अवलोकितां, उठुनि तो तेथें उभा राहिला.
गौरीनें गजवक्र पुत्र बरवा संतोषुनी पाहिला. ॥ ३०
"केलें विघ्न तुवां बळेंचि मजला, येतां यया मंदिरा;
तूं 'विघ्नेश' म्हणोनि होसिल जगीं विख्यात, लंबोदरा. ।
जे तूतें भजतील, तेचि सकळें कर्में वरीं साधिती.
ज्याला भक्ति नसे त्वदर्चनविधीं, विघ्नें तया बाधती. ॥ ३१
ऐसे अनेक वर देउनि नंदनातें,
संतोषवी शिव, तथा गिरजामनातें. ।
भोळा, वदान्य, करुणाकर भक्तलोकां
वीरेश्वरप्रभु सदा सुखवी, विलोका. ॥ ३२

---

## २. राधाविलास.

(आनंदतनय.)

राधाकृष्णविलास हा परिसतां बाधा भवाची हरे.
साधा साधन हेंचि, मोक्ष बरवा साधावया मोहरे. ।
मेधा श्रीभगवत्पदाब्जयुगळीं वेधावया हे कथा.
ये धांवोनि शमादि संपति घरा वेधा म्हणे हे कथा. ॥ १

विरह बहु हरीचा वाटला भामिनीला.
प्रतिपळहि निखंदी कामिनी यामिनीला.
विषसम विषयातें मानिते गोपजाया.
"कवण गति करूं, बो, श्रीहरीकोप जाया ? ॥ २
उदार तो आजि उदास कामा, । जो पूर्वी कीं निजदासकामा- ।
बाई, न माझा अपराध कांहीं. । पावे हरी तो जड साधकांही. ॥ ३
मजविना पळही न वसे हरी. । कठिण आजि कसा, वद लौकरी. ।
स्मरशरें खुतलें मन, साजणी. । कवण दाखवि शीघ्र सखा, धणी ? ॥ ४
मृदुलतर तनू हे तापसंतप्त जाली.
गति विरहशिखीची होय कैसी निजाली ? ।
झडकरि मज दावीं देव तो वेणुपाणी.
निढळीं नमिन त्याचे पायिंचे रेणु, पाणी. ॥ ५
मलय फणिविखानें माखिला मंद वारा;
मृदुतर तनु माझी पोळवी तो. निवारा. ।
जलधिमधुनि आला इंदु बंधू विखाचा;
क्षणहि, सखि, न सोसे स्पर्श त्याच्या शिखांचा. ॥ ६
मोडा, बाई, मान त्या कोकिळाची. । दावी गोडी केवढी, बो, किळांची. ।
झुंकारें हे भृंग कां, हो, निघाले ? । घालों आले चोरटे थोर घाले. ॥ ७
हुरहुर बहु वाटे, दुःखसताप दाटे;
गमति मृदुल कां ते पुष्पशय्या सराटे. ।
मलयज फणिफेनातुल्य हातें शिवेना.
सुरसिक हरि येना कां, सखे, भेटि देना ?" ॥ ८
चतुर सखि म्हणे, "बो राजसे, राजबाळे,
निरखुनि तुज डोळां नित्य गोपाळ भाळे. ।
न कळत जरि कांहीं चूकि जाली असावी,
सरूप कुपित जाला, लोक आश्चर्य भावी." ॥ ९
"मजवरि बहु, बाई, लोभ त्या श्रीहरीचा.
सतत करितसें मी छंद नानापरीचा. ।

न कळत सलगीनें बोलिलें येक कांहीं.
सुरतसमयीं बोली कीजती बायकांहीं. ॥ १०
'हें तूझें पदपद्म पद्मज नमी, पद्मालया तें चुरी,
तो तूं पद्मदलायताक्ष मजसीं सर्भी न होसी दुरी, ।
या त्रैलोक्यततींत शक्य न कहीं त्वद्रूप लक्षावया,
तो तूं म्यां धरिलासि बाहुयुगळीं. मी धन्य कीं, राजया!' ॥ ११
म्यां केलीं वचनें असीं सरसता. हा काय अन्याय, मा?
शिक्षाया मज बोपिलें, कटकटा! यालागिं अन्या यमा? ।
कां पां मारविलें मला सुमशरीं या घोर मारा करीं?
जा, सांगा, विनवाः प्रफुल्लित फुलीं कीं तूंचि मारा करीं." १२
दूती म्हणे, "तूज तुझेचि चाळे। आले फळा. काय वदेन बाळे?।
सुधानिधी तो, सखि, तूंत लोली;। तशासही या करिसील बोली. ॥ १३
सकाम लोकां प्रमदा, मदासी। दावूनि, । देती श्रम, दामदासी.।
निष्काम कीं हा हरि कामनेला.। येणें लया सत्वर काम नेला. ॥ १४
ज्याच्या ध्यानें भान नासे भवाचें,। येतें हाता राज्य चिद्वैभवाचें,।
तो हा शौरी दाखवी लोकलीला.। बोलें ऐशा त्वां, सखे, मोकलीला."॥१५
"माझे हे अपराध लक्ष घडले. सांगा, 'करावी क्षमा.'
मातें भेटविं माधवा स्वहृदयीं कीं तो क्षमेची क्षमा.।
बोलूं काय हरी अपाय" म्हणुनी सप्रेम पायां पडे.
"ऐसा लोभ करीं, सुशोभन हरी जैसा भुजीं सांपडे." ॥ १६
दूती म्हणे. "न करिं खेद. जना, वनातें
धुंडोनि आणिन, सखे, सुजनावनातें." ।
जे हिंडती त्यजुनियां मद आणि कामा,
त्यां सांपडे हरि जगांत, न आणिकांना. ॥ १७
चतुर चपळचाली चालिली च्यारि वांवें.
तंव पुनरपि बाहे. "फार, बो, बोधवावें. ।
नमुनि मृदु वदावें, 'म्यां नमस्कार केला.
तव अधरमधूची क्षुत्तृपा राधिकेला.'" ॥ १८

दूती वाक्यविशारदा मग वना आली, जशी शारदा.
देखे दृष्टिस नारदादिवरदा, चित्सारसंभारदा, ।
जो उद्दाम, उदार, दासनिकरीं वृंदावनीं, पारदा
ऐसा खेळत; वारि दानवमदा, जो व्योम सद्वारिदा. ॥ १९
तीरीं तें पुलिनें, जलांत नलिनें लक्षोनि लक्षानधी,
आनंदें फुगली, मनांत उगली येवोनि सद्भावधी. ।
नाहीं ज्यासि दुभाव, तो हरि उभा, गाभा परंज्योतिचा,
साष्टांगें नमिला. त्रिताप शमला. तो ठाव विश्रांतिचा. ॥ २०
ते पद्माकर, ते सुगंध बरवे, ते वोघ, ते वाहिनी,
ते वल्लीद्रुम, तें प्रफुल्लकुसुमें, ते भा जगन्मोहिनी, ।
ते गानध्वनि, ते मनोज्ञ मुरली, ते गोप, तें गोधनें,
तें वृंदावन, तो मुकुंद नमिला साष्टांग संबोधनें. ॥ २१
" जी जी कृष्ण, कृपानिधी, कुवलयश्यामा, जिवाच्या जिवा,
तूं सर्वात्मक, सर्वकारण, जगत्साक्षी, शिवाच्या शिवा. ।
तूतें शेष, अशेष वेद, कथिता मदावले. मी किती
वानूं पामर? पार नेणति यती, मौनी. मनीं भाविती. ॥ २२
' साक्षाद्ब्रह्म; कृतावतार धरिली लीला तनू मानुषी;
हा भूभार हरावया विचरसी, ' हें व्यास बोले ऋषी. ।
त्या तुझ्या पदपल्लवास जडल्या या वल्लरी नायका.
कामें मोगिति, भोगिभोगशयना, वामा, रमानायका. ॥ २३
असो. हें किती? फार बोलूं कशाला? । दयेनें तुझ्या भोगभाग्या विशाला. ।
अशांहीवरी कोप कां तां धरावा? । तुझ्या त्या जगीं; तूं न त्यांला परावा. ॥ २४
त्यांला तूज अभेदभावचि असे. संसारसंगें पडे
मध्यें अंतर कांहिंसें. मग तुझ्या योगें पुन्हा सांपडे. ।
तूझ्या मुख्य दयेसि पात्र ललना. स्वामी, करावी, क्षमा.
राधा त्वद्विरहानलें हुरपळे. मानी बुडाली क्षमा. ॥ २५
तुझ्या वियोगेंच धृती उडाल्या, । तीच्या मतें भूमि, दिशा बुडाल्या, ।
आकाश हें कोसळलें तुटोनी, । तरी हरी का तुळसी नटोनी? ॥ २६

विरहजनित तापें वालिका पाळि जाली.
वधुहृदयदरी ते कामबाणीं बुजाली. ।
न पुसलि मज कोठें, काय आहे कशी, मा ?
तव सदयपणाची जाहली सर्व सीमा. ॥ २७

जे योषिता भव्य लता विजेची, । ते दीसते चंद्रकळा विजेची. ।
हळू तरी माळ गळां न सोसी, । नमीन मी कृष्ण, अशी असोसी. ॥ २८

कांहीं न जेवीच, विडी न चावी. । तेथें फुलीं सेज कशी रचावी ? ।
तृषा कृशांगी नमनी त्रिलोकीं; । मृषा नव्हे, तीस तुझीच लोकीं. ॥ २९

परिसुनि परमात्मा, पूर्णलीलावतारी,
हृदयिं धरि तियेतें, जेंवि मूढासि तारी. ।
मग हरि करुणेचा सिंधु, तो दीनबंधू,
कर धरुनि तियेचा ऊठिला रामबंधू. ॥ ३०

तों तेथें सदनांत चंद्रवदना राधा सखीची गती
पाहे; तों निजवामलोचन लवे, बाहू स्फुरों लागती, ।
सारी बोलति शोभन ध्वनि, शुभीं शब्दीं वदे कावळा,
" वाटे येचि घडी सुलाभ; सखिये, भेटे सखा, सांवळा." ॥ ३१

पौहों निघाल्या मग शीघ्र आळी. । आलीच त्या, धांवति सर्वकाळीं. ।
आलीढ ज्यांचें मन त्या कृपाळीं, । 'पाळीं' म्हणोनी नमिती कपाळीं. ॥ ३२

पोरी धांवति, पाहती गजगती, गौळी समानाकृती
सौरीनाम नदींत टाकुनि, निघे शौरी विनोदाकृती. ।
मौळी मंडित गुच्छ, सुस्तबकही चौळीं विराजे वरा.
पौळीं फांकति भा, म्हणोनि उडती गौळी धरा अंबरा. ॥ ३३

हा लागला मोहरिमागमार्ते, । जो कीं न ठावा निगमागमार्ते. ।
आला घरा कृष्ण. " कृतापराधे, । नको करू तूं स्मरताप, राधे." ॥ ३४

आली राधा मंदिरद्वारदेशा. । पाहे डोळां इंदिरेशा, परेशा. ।
खेदें, मोदें, लोचना बाष्प आलें. । हंसा ऐशी फुंदफुंदोनि चाले. ॥ ३५

येऊनि धांवुनि पुढें विमला करानें
तें बाष्प सर्व पुशिलें कमलावरानें. ।

आश्वासिली, कवळिली बहुधा तयानें,
ज्याचा प्रभाव कथिजे बहु घातयानें. ॥ ३६

हातीं देउनि हात, तो मग तिच्या आला घरा, मचका.
राधा जोडुनि पाणिपल्लव म्हणे, "आम्ही न हों वंचका. ।
का केला मज राग? सांग सखया. गेली घडी कल्पसी.
त्वद्योगें तरि कल्पकाळगतिही वाटे मला स्वल्पसी. ॥ ३७

सतत तवकथाब्धीमाजि हे बुद्धि नाहो.
विततविषयजाळीं स्वल्प हे शुद्धि नाहो. ।
प्रतिजनर्मिहि आम्हा तूचि व्हावासि नाहो.
अतिशय तरि ऐशी प्रीति माझ्या मना हो. ॥ ३८

ज्याची कृपा भाग्य समस्त वीते, । ज्याच्या पदा वेदसम स्तवीते, ।
ज्या ईश्वराची अनिवार माया, । त्या चित्स्वरुपीं चमके रमाया. ॥ ३९

स्तवुनि, हरिपदाब्जीं स्पर्शिले नेत्र दोनी.
मग उगि सरसाक्षी रम्य वाणी वदोनी. ।
तव हृदयिं हरी तो भेटला नेटपाटें.
झडकरि मग तीनें लाविलीं तें कपाटें. ॥ ४०

सकळहि व्रजनारी बोलती येकमेका.
नवल करिति मोठें, लावुनी बोट नाका. ।
हरि घरि यवढी हे प्रीति या राधिकेची,
गुणचरित विधीही तो न वर्णू शकेची. ॥ ४१

नाना तर्पे करुनि यापरि वासुदेवा
ते इंदिरा करि सनातनपादसेवा. ।
त्या धन्य गोपललना! हरि ज्यासि वानी.
आनंदनंदन मनीं अति चोर मानी. ॥ ४२

## ३. नौकाचरित्र.

(आनंदतनय.)

लोकानुग्रहकारणें, व्रजजनानंदें, जगत्कारणें,
श्रीगोवर्धनधारणें, सुखघनें, पापत्मकोद्धारणें, ।
भक्तत्राणपरायणें, सुचरितें गंभीर, नारायणें
केलीं तें भवहारणेंचि परिसा, श्रोत्रांसि जें पारणें. ॥ १
पुरंध्री गोपांच्या क्वणितवलया त्या चमकती.
गतीनें त्यां हंसी लवभरिहि [1]तोलों न सकती. ।
नगांच्या त्या श्रेणी झळकति सुवेणीवरि तयां.
सदा गोविंदाच्या विचरति सवें ज्या फिरतया. ॥ २
व्रजामाजि मोठा चमत्कार देखा. । जनीं नाणिजे कामकैवल्यलेखा. ।
यशोदासुतें, कोटिकंदर्परूपें, । सुखें दीधलीं गोपिकांला अमूपें. ॥ ३
वेडावल्या हरिगुणीं सुगुणाभिरामा,
रामा, रमाकृति समा, भजती सकामा. ।
कामाचिया विनटल्या जनका प्रकामा. ।
कामांत या विफळ काळ असे रिकामा. ॥ ४
ऐका त्याउपरी अनर्घ टिपरीं हाणीत नानापरी;
गाती त्या कुसरी, जयास दुसरी नाहीं त्रिलोकीं सरी; ।
कृष्णीं प्रीति बरी; विलोलकबरी त्या नाचती; अंबरीं
तेजाची लहरी, तडिद्द्युतिहरी, देखूनि तुष्टे हरी. ॥ ५
एणीदृशांसि चल वेणीवरी खचित लेणीं सदा मिरवती.
पाणीलता मृदुल, वाणी सुधा मधुर, गाणीं न ते वदवती. ।
प्राणीं महोज्वल सुपाणी सदा डुलत माणिक्यभा प्रगटल्या.
राणी अशा, शुक पुराणीं जयां स्तवित, रानीं सुखें विनटल्या. ६
या रिती सरस गात रातल्या. । भानुजातटसमीप पातल्या. ।
भव्य, दिव्य पुलिनें विराजती. । चंद्रिकाद्युति जयांसि लाजती. ॥ ७
घेती कडे घडिघडी गडि योगियाचा,

---

१. तोलों.

जो वैद्यनायक जगीं भवरोगियांचा, ।
ज्याच्या पदासि विनयें नमि लोकमाता,
त्यासीं सहास्य वदती व्रजलोकमाता. ॥ " ८

त्या खेळती, हेमलसद्दुकूला, । कृष्णावलोकीं परमानुकूला, ।
तों देखिली नाव नदींत कूला- । पाशीं; तदा दाविति त्या ठकूला. ॥ ९

ब्रह्मादिकांचा ठकडा मुरारी, । अंकीं तया घेउनि सर्व नारी, ।
आल्या चिरें सांवरुनी करानें । संतोषिजे तें कमलाकरानें. ॥ १०

भक्तांच्या वरदायकासह तरी आल्या जशा पायिका.
मोठ्या थोर बळाय कातरदशा प्रीती जगन्नायका. ।
पूसे त्यां हरि, काय काम सलिलामध्येंच भीदायका?
भासे, वाहिनि सायकासम चळे. सान्या तुम्ही बायका. ॥ ११

ऐका मायानदीच्या प्रबळगतिजळीं शक्ति कैंची तराया!
बाळाला युक्त नोहे कांहिं परपुरपावीण हे उतराया. ।
अभ्यासज्ञानयोगाविरहित अबला, काम ठाके न कांहीं.
शौरीगंभीरवाणी परिसुनि, धरिलें चोज तें बायकांहीं. ॥ १२

आकर्णुनी वचन पूर्ण सुवर्णवर्णा
तारुण्यघूर्णमति वर्णिति वर्णवर्णा. ।
" हा लाहनांत अति लाहन; थोर, थोरीं.
कीं नेणिजे हरिगुणार्णव थोरथोरीं. ॥ १३

क्रीडल्या वधु मनोरम नावे. । ग्रंथ हे जानें मृपा नमनावे. ।
यादवें प्रगटितां जनलीला । येकदा रस असा उचलीला. ॥ १४

ऐका म्हणे शुक. ' तया तरणी तराया
आल्या सतोष तरुणी तरणीत, राया. ।
हा खेळ बो बहु दिसां मनिं सूचला, गे.
नावेमधें सकळ आजि वसूं चला—गे. ॥ १५

स्कंधावरोनि कटिं खोंविति अंचळातें,
आच्छादुनी पदरिं पीन कुचां चळातें. ।

१ कमलाकरानें. २. काम टाकोनि कांहीं.

एकीं ढिले करुनि वध बरे निरींचे,
तैं सज्यती कुसुमहार परोपरींचे. ॥ १६
येकीपुढें येक धजोनि बाळा, । घेरोनि सर्गे व्रजलोकपाळा, ।
नौकेमधें लौकरि त्या बसाया । येती, अशी अद्भुत देवमाया. ॥ १७
हातीं धरोनि अबलीं, नवलाव देखा,
ते लोटिली तरि जळीं. न करोनि लेखा. ।
तागा तळासि नलगे, तव अब्रिटेंका
घेवोनि, तोडिति जळें, हसती कितेका. ॥ १८
कर्णींचे नग हाळती, उंसळती वक्षोजहारावळी,
जघोरुद्रुम तोलतो, अलकभा डोले तदा सावळी, ।
अदू नूपुर बोलती, वलय ते हातीं झणत्कारिती,
धम्मिल्लांतर मालती गळति, त्या योषा चमत्कारती. ॥ १९
गाताति द्रुक्तिरवें फलकठकठी,
जेणें रवें दिवस तो शितिकठ कठी. ।
गानध्वनी अमृतनिर्झरसारसाचा,
भोक्ता तया यदुपती, श्रुतिसार, साचा. ॥ २०
" जय दयाघना, इंदिरावरा, । जय पुरातना, लोकनागरा. ।
जय निरंजना, निर्गुणा हरी. । निराखें आमुतें, स्वामि, लौकरी. ॥ २१
जो साधुन कासी । देखत या कामाच्या जनकासी. । हा सखये । कंसाचा मारक, वो. । मोहमहासिंधूचा तारक, वो. । हा सखये । तो गानानिशीं दिनशीं । भोगाना बहु नवशीं. । हा सखये । बैसुनिया तनु-नावे, । श्रीहरिचे गुण गावे । श्रीगुरुराज । बाधुनि मज । पाहुनि चोज । चालवी भोज । नावाडी तो तारी. । हा सखये । अतविणा जळततु हा खळासि । तारिति वळवत नरासि. । आशेच्या घनसुसरी । आकळुनी नेति दुरी. । हा सखये । गर्वजळें उसळतसे । गगनवरी तळपतसे. । हा सखये । मदलहरी नाचरती । नर आचरी वावरती. । हा सखये । मी चतुरोत्तम, । मी परमाधम, । मी सुखिया, दुखिया, जड. । मीपण-

१. सज्जिती. २. उचलती

मासा खळबळितो, । घोरविपयघांसा तळमळितो. । हां सखये । ममतेची नागिण, हो. । सरितेची जोगिण, हो. । हां सखये । ऊठ झडझडोनि सावध हो पथ नीट विचारुनि कांस कशी जरि साट पिसोटप्रणें धारेशिल तरि लाटबळें दुरी वाहसी. । तरि तारुण्याची गति ऐका. । तरि देह हे नौका. । हां सखये । जोडिलिसे सुलभपणें । आदरिजे हे आपणें. । हां सखये । पांचांचें दळ वाढे । रचुनियां पडिपाडें, । रचिलें, हो, भवतारू. । जडजीवां हें तारू. । हां सखये । पावविता परपारीं, । दीनांचा कैंवारी, । तो, बाई, भव वारी. । शंखचक्रधर, वो. । दयानिधि रंकजनोद्धर, वो. । परात्पर, कोटिकामतनु, वो. । रमापति, पंकजलोचन, वो. । तो हा मंदरोद्धर, नंदनंदन, पुरंदरवृंदवंदन, सुंदर, शोभन, पावन, सज्जनभावन, आनंदतनयविभु. ॥

नावेसि नेत यमुनेंत सदानवारी,
गाती विशंक, तरती अनिवार वारी. ।
"आम्ही बळेंचि तरलों" म्हणतां स्वभावें,
केलें तदां कुतुक तेथ महानुभावें. ॥ २२
नौका जुनी, अति पुरातन, भूरी गात्रा,
जीमाजि कोशगृहपंचक पूर्ण मात्रा. ।
वायोबळें चळतसे, न कळेचि कोणा,
ये, जाय ते कसि? अहा दिसते निमोणा. ॥ २३
सच्छिद्र ते सहज धांवली मध्यधारे
नौका तरंगगुणसंकुलिता त्रिधारे. ।
त्या नेणती सुमति हावभरीं तरीच्या.
पोटीं उठे उमळ तो मृदुअंतरींच्या. ॥ २४
नावेच्या उदरीं झरे वरि वरी, त्या लक्षिती सुंदरी.
भांबावोनि परोपरी चमकती साशंक शातोदरी. ।
तेव्हां युक्ति वरी, विनोदकुसरी, सांगे हरी. "आयका.
आशा कुंचकिची त्यजा, मग बुजा नौका तुम्ही बायका.॥ २५
नागकन्या जशा देहकांचोळिया, । तेंवि काढाचि संदेहकांचोळिया. ।

भीति कैंची श्रुतीसार सांभाळितां ?" । धीर दे त्यांसि दक्सार सांभाळिता.२६
" सच्छिद्र कुंभासि जशा रितीनें, । कीजे, सख्यांनो, दृढता मतीनें. " ।
ऐकोनियां गोकुळिच्या पुरंध्री । त्या कंचुकी दाटिति नांवरंध्रीं. ॥ २७

कृष्णाची परिसोनि युक्ति, विवरीं त्या कंचुकीचे पिळे
रोपें दाटिति; लोट ते न धरती, लोटोनि जाती खिळे. ।
बोधाची उकळी चळे उसळतां, बाळा चळीं कांपती.
लोलाक्षी सकळा अतीव विकळा होवोनियां ठाकती. ॥ २८

"वारी कांहिंच नांवरे. डगमगी राहे कशी नाव, रे !
गर्मी भीकर भोंवरे. गमति ते पुष्पीं जसे भोंवरे. ।
भेणें मानस वावरे, यदुवरा, वाटे जिणें वाव, रे.
ये वेळे कसि आंवरे तरि ! हरी, गेला दिसे आव, रे. ॥ २९

कैंचा वोडवला विलास नसता ! कीं सर्व संसारिका
कां आलों निरखूं तटीं शुकशिखीहंसादिकां, सारिका ! ।
कैंची आठवली सरित्तटतरी ! आम्ही जडा बायका.
कैसें आजि चुके महा व्यसन हें, हे द्वारकानायका ! ॥ ३०

नाहीं चिंता गेहदेहादिकांची । तूतें आम्हीं आणुनी बुद्धि काची ।
केली. कृष्णा, कैंवि राखों जिवाच्या। जीवा, देवा, तूज गेया शिवाच्या ! ३१

कां आणिलें, कटकटा ! तुज संकटीं या ?
कीं गोरटी धमकटी त्रिजगन्नटी या. ।
होतासि खेळत घरीं व्रजगोविलासीं
दाटोनि आणुनि तरीप्रति गोंविलासी. " ॥ ३२

दैन्यें अशा निगदती व्रजगोपकन्या.
धन्या जनीं निगममान्य, हरीअनन्या. ।
युक्ती दुजी प्रगटिली विहगासनानें,
संसारिकांसि भयकद्र्यनाशनानें. ॥ ३३

" ऐका, गे, अचिरें चिरें सुरुचिरें घ्यावीं, विचारा बरें.
दाटावीं विवरें करें." सुखकरें त्या कृष्णवाग्डंबरें ।

त्या निःसंग, कुरंगमंजुनयना, भृगालका, अबरें
हातीं घेति. विनोद तो निरखिजे देवें सुवर्णांबरें. ॥ ३४

सगत्यक्त दिगंबरा तरितटीं कोंदाटिती अंबरा,
ज्ञाता मानुनि शंबरारिजनका, सतसहेमांबरा ।
नोहे हे धड शंबराहि वसनीं, भ्राता वधू, बभरा
ऐशा, प्रार्थिति दमरागरहिता त्या येक विश्वंभरा. ॥ ३५

चीरें बिळीं मुरेडिताचि अपाप साऱ्या,
पेळा जशा उचटती मग कापसाऱ्या. ।
पाणी उचंबळत तुबळ अंबरासी,
ऐसें तरींतुनि उफाळत अंबुराशी, ॥ ३६

नीराधारी, हा निराधार जाला. । धारा सारा वारिधारा बुजाला. ।
चिंताक्रांता सर्व गोपाळकांता । घेती धांवा, लोलनीलालकांता. ॥ ३७

त्या बोलती पुनरपी ललना हरीतें.
" हा ! हा ! कटा ! कवण संकट हें हरीतें ! ।
पृथ्वी उडो, नभ पडो, परि तू मुरारी,
याया कडेसि. तुज रक्षु विधी, पुरारी." ॥ ३८

ऐशा जों वदती समस्त सुदती, तों मेघमाळांतरीं
नेटें वीज कडाडिली. दचकल्या गोपांगना अंतरीं. ।
वारा चंड झडाडिला, घनरवें वृक्षावळी थाकल्या,
गारावर्ष धडाडिला निबिड तो, दाही दिशा दाटल्या. ॥ ३९

अस्ताद्रीवरि रश्मिराज चढला, ध्वांतौघ हा रूढला,
कौठीं वेढुनि वारिचारिगण तो नावेसि आरूढला. ।
पूरोत्कर्षहि वर्षवारिसुभरें कल्लोळसा वाढला.
कांताच्या निजअंतरीं प्रबळ तो चिंतांबुधी गाढला. ॥ ४०

नारी सर्वहि धांविन्या, वळंघले तच्चित्त वाऱ्यावरी.
" कृष्णातें उचला, भरा. " म्हणुनिया हाकारिती त्यावरी. ।

---

१. मुरडितांति. २. भावे

येकीयेक पुढें नेटोनि ह्रिर्ते ' मी मी ' म्हणोनी कडे
घेती, पाहति नीलरूप सरिता ते जीकडे तीकडे. ॥ ४१

" बाई, नदी हे भगिनी यमाची. । काळी तशी भीकर; मात साची. ।
तरंगहस्तें अॅवला धराया । उँकावळी. आंवारि, कृष्णाराया. " ॥ ४२

जानूपर्यंत पाणी त्वरित जंव चढे, तों कडे चक्रपाणी
पाणिद्वंद्वारविंदें सदृढ बसविला, गाइला जो पुराणीं. ।
बॉणी लक्षी पुन्हा तों जळ कटिनिकटीं ये; तदा शीतभानू,
भानू, डोले जया, त्या ह्रदयिं कंवळिला. चित्र तें काय वानूं?॥ ४३

जळिं बुडेल हा बाळ धाकला, । युवतिंचा तदा जीव धाकला. ।
प्रथम जाउनी घेतला कडे. । तटिनिच्या भयें चित्त सांकडे. ॥ ४४

चढतिया जळीं मज्ज मातला, । तंव उरस्थळीं कृष्ण सज्जिला. ।
भुजलतायुगें त्या स्तनद्वया– । वरि वरांगना घेति अद्वया. ॥ ४५

सलिल तेथही पातलें जई । हरिपदा नमूं वेध तानई. ।
लगबगां तदा स्कंधकंधरीं । उचलिती हरी गोपसुंदरी. ॥ ४६

वदन जों बुडे त्या पुरें पुरें, । भिजती जोंवरी अंघ्रि नूपुरें, ।
अहह! योषितीं ऊर्ध्वहस्तकीं । हरि उभारिला स्वस्वमस्तकीं. ॥ ४७

तशा त्या निर्वाणीं सकळ साति गीर्वाणवरदा,
महादीनावाणी स्तविति कळवाणी, शुभरदा. ।
" जगद्बंधू, अंबूमधुनि, गुणसिंधू, निजकरीं
त्वरें काढीं, देवा! करुं चरणसेवा झडकरी. " ॥ ४८

तदा प्रौढा नारी समजुनि हरीचीच करणी,
शिरस्था कृष्णातें विनविति सती त्या प्रकरणीं. ।
" तुझ्या, कृष्णा, आम्ही सकळहि कृपापात्र ललना.
तरी तारीं तारारमणवदना, लोकललना. ॥ ४९

नेणों भूप्रांत पाणी उसळत चढतें ? पार नाहीं विजांला.
वारा वेगें झडाडी, तुटुनि नभ पडे, थोर उत्पात जाला. ।

१. सरोनि. २. अचळा. ३. उंचावली. ४. वाणी. ५. तारारमणवदनालीककरणा.

वारा वाटा मनाच्या. प्रेमळगतिजळीं वृद्धि झाला. असारें
मूढाहकारयोगें निखिलहि घडतें. कांपती लोक सारे. ॥ १०
मेघीं अबर बोळवें, तमभरें सर्वत्र झाकोळवें,
कृष्णा, मानस पोळलें, बहुभयं हें धैर्य आदोळलें, ।
तारू ऊर्ध्व उफाळिलें, जळचरीं दष्टोत्करीं चालिलें,
आता पूर्ण न्यहाळुनी, यदुवरा, ता पाहिजे पाळिलें. ॥ ११
आत्मारामा, योगमायाधरा, रे, । रक्षीं रक्षीं सर्वथा येधवा, रे. ।
पूर्णानदा, वेदवेद्या, अपारा, । आम्हा दीना पावरीं आजि पारा. " ॥ १२
"लावोनि लोचन, धरा हृदयीं मला या.
चिंता न काहिं मग, कारण ना रडाया." ।
येवोनि हें युवतिहीं निजवाक्य कानीं,
आलिंगिला हरि जसाच शुकादिकानीं. ॥ १३
सकलहृदयदेशीं जो प्रभू सज्ज नादे,
परम सुख निजाचें शीघ्र जो सज्जनां दे, ।
निजहृदयिं हरी तो घेतला वेगळाला
युवतिस तनुभावाभास नाते गळाला. ॥ १४
येकलाच सकळा ललनाचे । श्रीहरी हृदयिं निश्चल नाचे. ।
येक तो परि अनेकरूपणातें । पावुनी प्रगटवी आपणातें. ॥ १५
अभोजाक्षिं जेवि वमर बसे, वक्षोजयुवावरी
अमोदद्युति जूमला हरि तसा, साक्षात्स्वयमापरी. ।
जंभारी, विधि, शमु, कुंभज मुनी स्तमोनिया अवरीं,
वर्षारंभ फुलीं मला निरचिला रमादिकीं सुदरीं. ॥ १६
तों त्या गोपनितबिनी निरखती श्रीकृष्णवाक्यानुगा.
जालें व्योम निरभ्र, शुभ्र किरणीं अर्भीं तपे भानु गा. ।
झाला मारुत मद, मत्स्यमकरी गेल्या प्रवाहास्तवें;
नौका ते तटिनीतटीं निरखिली. केलें जगद्वासवें. ॥ १७

---

१. प्रबळ फुललिसे. २. यादवा.

तेव्हां सस्मित विस्मिता व्रजवधू नौका अकस्मात ते
तीरीं देखुनि, लेखिले तृण असे उत्पात ते मातते. ।
जालें क्षेम, गुणाभिराम हरिनें गोपांगना तारिल्या.'
तद्वस्तुस्तवनीं समस्त सुदती सप्रेम विस्तारल्या. ॥ ९.
आनंदले युवतिवृंद. अरिंदमाला ।
ते अर्पिली कनकचंपककुंदमाला. ।
त्या नंदनंदनपदाप्रति येकभावें
आनंदनंदन कवी नमितो स्वभावें. ॥ १०

## संतप्रताप.

(श्रीधरस्वामीकृत.)

अपार महिमा । संतांचा वर्णवे कोणा ? ॥ ध्रु० ॥
आचार्य शंकर जाण, । देवी देत स्तनपान,
मतें उच्छेदी संपूर्ण. ॥ १ ॥
हस्तामळक सज्ञान । अष्ट वरुषें मोहन ।
वोले आचार्यास देखोन. ॥ २ ॥
कलियुगीं हरिनाथ । अवतरला रमाकांत. ।
मांडीवरि श्रीपद दावित. ॥ ३ ॥
जयंतपाळें ब्राह्मण । कोंडिले हें जाणोन ।
मुकुंदराजें प्रगटिलें ज्ञान. ॥ ४ ॥
पशुमुखें वेदध्वनि । करविली प्रतिष्ठानीं, ।
ज्ञानेश्वर ज्ञानाची खाणि. ॥ ५ ॥
चौरंग करूनि सत्य । मारिला जो राजसुत, ।
उठवित गोरक्षनाथ. ॥ ६ ॥
मातेच्या वचनें वोध, । वैराग्य धडधडित शुद्ध, ।
महाराज राजा गोपीचंद. ॥ ७ ॥
महामुद्गल देखोन । करींचा पात्रा टाकून ।
घेत हातीं धनुष्यबाण. ॥ ८ ॥

बिल्वमंगळ रामाहातीं । मुरली धरवी प्रीती; ।
अयोध्येंत केली हे ख्याति. ॥ ९ ॥
मिराबाईचें विष । प्याला जगन्निवास; ।
गोष्टि हे ठाउकी सर्वांस. ॥ १० ॥
नृसिंह मेहता महाभक्त । हुंडी त्याची भगवंत ।
द्वारकेमाजीं भरित. ॥ ११ ॥
भानुदासाच्या गळां । घातल्या कंठींच्या माळा, ।
आंग,रगाडिलें ते वेळां. ॥ १२ ॥
महारामेश्वर भक्त, । राम झाला त्याचा सुत; ।
नंदादीपा तेल आणित. ॥ १३ ॥
एकनाथाचे घरीं । कावडी वाहत हरि; ।
चमत्कार दावी मुरारि. ॥ १४ ॥
वधून टाकिली गाये । नामदेव हरीस वाहे. ।
उठविली सर्वेचि लाहे. ॥ १५ ॥
पद्मावतीचे प्राण । गेले होते निघोन. ।
जयदेवें आणिले परतोन. ॥ १६ ॥
धाना जाटाचें शेत । पेरी स्वयें भगवंत. ।
तुकोबाच्या वह्या राखित. ॥ १७ ॥
जसवंतास नवज्वर । जाला असतां फार, ।
जानकीनें पाजिलें नीर. ॥ १८ ॥
अच्युताश्रमाचा नेम । सर्वां हातीं म्हणवी राम. ।
भक्त भेटला निःसीम. ॥ १९ ॥
विठ्ठल पुरंदर । उघडिलें त्यास द्वार. ।
सुरदासा दिधले नेत्र. ॥ २० ॥
सेउ सीतम महाभक्त । अन्न देती दुष्काळांत; ।
भगवतें पाहिला अंत. ॥ २१ ॥
कबीर निजधामा जात, । मागें न दिसेच प्रेत ।
पुष्पें आणि तुळसी होत. ॥ २२ ॥

ध्यानीं वस सेना भक्त, । त्याचें रूप राम धरित.
रायासीं, हो, तेल मर्दित. ॥ २३ ॥
रोहिदास सप्रेम । फिरोनि ये शालिग्राम; ।
भावाचा भोक्ता श्रीराम. ॥ २४ ॥
कूर्मदासा नाहींत पाये, । विठोबा भेटीस जाये. ।
सांवत्याचे पोटीं सामाये. ॥ २५ ॥
कुल्लाळ गोरा भक्त, । तोडून घेतले हात; ।
पंढरिये पुढती फुटत. ॥ २६ ॥
सतीदास मयराळ बाळ; । निश्चय देखोन निर्मळ
धावली रुक्मिणी वेल्हाळ ॥ २७ ॥
नागोबा जनमैत्र; । व्याघ्ररूपे त्रिनेत्र ।
भेटला, हें मोठे चरित्र. ॥ २८ ॥
चांगदेवे आपली । मोट दृढ बांधिली. ।
पांडुरंगें हृदयीं धरिली. ॥ २९ ॥
नरहरी सोनारे । कडदोरा घडिला, खरें. ।
विठोबाचे माजीं न पुरे. ॥ ३० ॥
अनामिक चोखामेळा । ब्राह्मणीं दवडिला; ।
विठोबा त्यालागीं फिरला. ॥ ३१ ॥
जाल्या समाविस्त । दर्शन दे रंगनाथ. ।
कीर्तनेंचि समध मुक्त. ॥ ३२ ॥
तोडून आशापाश, । सर्वदाही उदास, ।
महाराज स्वामी रामदास. ॥ ३३ ॥
देखोन गुरुभक्त । वृंदावन डोलत, ।
आनंदमूर्ति तो समर्थ. ॥ ३४ ॥
जयरामस्वामी संपूर्ण, । पांडुरंग प्रसन्न; ।
करविले श्रीकृष्णदर्शन. ॥ ३५ ॥
ब्रह्मानंद समाविस्थ । जाल्या, वाहे येक भक्त; ।
'वो' ऐसी ध्वनि उठत. ॥ ३६ ॥

असोत आतां बहुत भक्त; । वर्णितां नलगेच अंत. ।
ब्रह्मानंदरूप समस्त. ॥ ३७ ॥
श्रीधरें प्रेम गुणीं । संतमाळा गुंफूनि, ।
गळां घाली दिवसरजनीं. ॥ ३८ ॥
अपार महिमा । संतांचा वर्णवे कोणा ? ॥ ध्रुं० ॥

---

# प्रश्नमालिका.

( वीरेश्वरकृत. )

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । ॐतत्सत् । " ॐनमो जी श्रीगुरुवर्या, । अज्ञानतमःसूर्या, । कृतनतजनकार्या, । बोधरूपा. ॥ १ ॥ आत्मलाभा विघ्न करिती । ऐशी जे अनाद्यविद्याभ्रांति, । तीतें परिहरी, गणपति, । अनुग्रह तुझा. ॥ २ ॥ तुझी करुणा, सरस्वती, । होय प्रसन्न जयाप्रति, । तो मान पावे त्रिजगती । गीष्पति सम. ॥ ३ ॥ चरणीं ठेवितां शिर । भक्तांसि होसी सुखकर; । अन्वर्थ नाम हें शंकर साजे तुज. ॥ ४ ॥ त्रिविधतापें तांतलें । मन व्याकुळ जालें; । कृपामृतवर्षे केवळ । निववावें, जी. ॥ ५ ॥ संशयवागुरातें छेदीं, । मोहपर्वत भेदीं, । मातें वैसवीं आत्मपदीं, । कृपासिंधु." ॥ ६ ॥ ऐशी करूनि विनवणी, । शिष्यें मस्तक ठेवितां चरणीं, । गुरु म्हणती, "आयणी । सांगें तुझी. ॥ ७ ॥ जो तुझ्या मनीं विचार, । तो प्रकट करीं साचार; " । तव येरू जोडूनि कर । विनविता जाला. ॥ ८ ॥ "(१) बंध तो कवण, । (२) मोक्ष किंलक्षण, । (३) अविद्येची खूण, । (४) कैसी ते विद्या? ॥ ९ ॥ (५–७) जागृत्स्वप्नसुषुप्ती । आणि (८) तुर्या जे म्हणती, । हें अवस्थाचतुष्टय मजप्रति । निरोपावें. ॥ १० ॥ (९–११) अन्नप्राणमनोमय, । (१२, १३) विज्ञानमयानंदमय, । हें कोशपंचक गुरुरायें । निरोपिजे. ॥ ११ ॥ (१४) कूटस्थ तो कवण, । (१५) जीवाचें काय लक्षण, । आणि (१६) क्षेत्रज्ञ म्हणणें । कवणासि पां ? ॥ १२ ॥ (१७) साक्षी कवण म्हणावा, । (१८) अंतर्यामी केंवि जाणावा, । हाही भाव निरोपावा, । स्वामी, मज.

॥ १३ ॥ (१९) कैसा तो प्रत्यगात्मा, । (२०) कवण्या गुणें परमात्मा, । (२१) उपाधिरहित आत्मा, । (२२) माया कसी ? ॥ १४ ॥ ऐसे बावीस प्रश्न बरवे, । कृपाधन, निरोपावे, । श्रवणमात्रें अघवे । संदेह निरसती. ॥ १५ ॥ आश्रितरक्षणीं चतुरु । सन्मुख जोडला कल्पतरु, । तरि मागावया, अयि, दरु । धरावा का ? ॥ १६ ॥ तू भक्तजनचिंतामणि, । म्हणौनि हे सलगीची विनवणी । केली, आता शिराणी । पुरवीं माझी " ॥ १७ ॥ एव ऐकोनि शिष्यवचन । श्रीगुरु जाले प्रसन्न. । म्हणती, " होऊनि सावधान । परिसा, सागो. ॥ १८ ॥ उघडूनि श्रुत्यर्थमादुस, । देऊ ज्ञानरत्नसुप्रकाश, । जेणें अज्ञानकडवस । फिटल तुझें. ॥ १९ ॥ आत्मा निर्मळ, निस्सग, । तया अनात्मदेहादिकाचा सग, । तोचि बध अभग । जाणावा पैं. ॥ २० ॥ देहेंद्रियादिकाचे धर्म । आपुले ठायीं आरोपिजती भ्रमे, । हेचि बधनाचे वर्म । पुढें जाणें. ॥ २१ ॥ मी श्याम, मी गौर, । मी श्रोता, मी बधिर, । ऐसा जो अभिमान दृढतर, । तोचि (१) बध. ॥ २२ ॥ ऐशिया अभिमानाची निवृत्ति, । बोधे होय जे आत्मप्रतीति, । जे कल्पनेची शाति, । तो (२) मोक्ष जाण. ॥ २३ ॥ निर्विकार आत्मस्वरूपीं । ससार सत्यत्वें आरोपी, । मीतूपणाते स्थापी । अज्ञान जें, ॥ २४ ॥ तें ससारासि कारण, । तेंचि (३) अविद्या जाण. । नावेक न धरी प्राण । विद्योदयीं. ॥ २५ ॥ जें वेदातविचारसत्यज्ञान, । तया (४) विद्या ऐसें नामाभिधान; । तेणें निरसे अज्ञान । स्वकार्येसीं. ॥ २६ ॥ ते विद्या द्विविध । परोक्षापरोक्षभेदें, । तें द्वैविध्य तुज विशद । करूनि सागों ॥ २७ ॥ वेदातशास्त्रविचार । ब्रह्म एक असे निर्धारें, । ऐसा जो बोध साचार, । ते परोक्षविद्या. ॥ २८ ॥ सर्वनिषेधमुखें श्रुति । जयातें प्रतिपादिती, । तें ब्रह्म मी, हे प्रतीति, । अपरोक्षविद्या. ॥ २९ ॥ ऐशी हे विद्या विपाये । जया गुरुमुखें अपेती होय, । तयाचा देहाभिमान जाय । निरोनिया. ॥ ३० ॥ मनोबुद्धिचित्तअहकार । आणि इंद्रियें द्विप्रकार । स्वस्वदेवतानुग्रहें, बा ˋ, । वावरती. ॥ ३१ ॥ ऐशीं चतुर्दश करणें । इहीं शब्दादि विषय घेणें, । तें जाण (५) जागरण । आत्मयाचें. ॥ ३२ ॥ नसती शब्दादि विषय, । तद्वासनायुक्त चित्तचतुष्टय, । तेणें विषयग्रहण होय । तें (६) स्वप्न. ॥ ३३ ॥

मनादिकें चान्ही । दटती स्वकारणाभीतरीं, । तन ते अवस्था चतुरीं । (७) सुषुप्ति म्हणिजे. ॥ ३४ ॥ जे अवस्थाचे भानाभाव । त्यासि साक्षित्वें असे वरवें, । स्वयें भावाभावरहित सदैव । तें तुर्य चेतन्य. ॥ ३५ ॥ त्या सर्वसाक्षिदशेतें । (८) तुर्या म्हणती सत. । नाक्ष्यभावें तियेतें । उन्मनी म्हणिये. ॥ ३६ ॥ चौं देहाचें विवरण । जाणावें पचकोशलक्षण; । मग यया विलक्षण । आत्मा जाणावे. ॥ ३७ ॥ पचीकृतभूतकार्य । स्थूळ देह हा अन्नमय, । अन्नरसें होय । म्हणोनिया. ॥ ३८ ॥ मायत्रापें भक्षिता अन्न । शुक्रशोणित होय तेणें, । तें दोनी एकवटता जाण, । सभवे हा. ॥ ३९ ॥ त्वचा, मास, रुधिर, । मेद, मज्जा, अस्थिनिकर, । इहीं षट्कोशीं जालें शरीर । (९) अन्नमय हें. ॥ ४० ॥ आणि प्राणापान, । व्यान, उदान, समान, । हे जाले रजोंशेकरून । पचभूताचे. ॥ ४१ ॥ प्राण हृदयांनि नासा वरी, । सचरे, अपान अधोद्वारीं, । व्यानवायु सर्व शरीरीं । सचरे गा. ॥ ४२ ॥ अन्नोदकातें समान । पावनी अवयवा समान. । उत्क्रमणवायु उदान । जाण, बापा. ॥ ४३ ॥ उपप्राणपचक । शरीरीं वणिर्ती कितेक. । त्याचा व्यापारही सम्यक । निरोपू तुज. ॥ ४४ ॥ **नाग** करी ढेंकर, । कूर्म तो उन्मीलनकर, । शिंका येती, कृकर, । देवदत्त, जाभई, ॥ ४५ ॥ धनजय तो पोषण । करी देहाचें जाण, । ऐसे दशविव प्राण । वर्तती देहीं. ॥ ४६ ॥ एव प्राणदशक । मिळता कर्मेंद्रियपचक । होय (१०) प्राणमय कोश देख, । बुद्धिवता. ॥ ४७ ॥ नाना सकल्प उठवी, । विषय वे इद्रियाकरवीं, । अहममता वाढवी । देहगेहीं, ॥ ४८ ॥ ऐसें तें, गा, मन । ज्ञानेंद्रियेंसहित जाण, । होय (११) मनोमय कोश, विचक्षण- । चूडामणि. ॥ ४९ ॥ भूतसत्वांशजनितें । ज्ञानेंद्रियें समस्तें । तत्सहिता बुद्धि जे निश्चित, । ते (१२) विज्ञानमय कोश. ॥ ५० ॥ जो देहद्वयासि कारण, । सर्वेंद्रियोपरमस्थान, । तया आनदविकारास्तव जाण । (१३) आनदमय म्हणिजे. ॥ ५१ ॥ देहद्वयाधिष्ठान । जें निर्विकार चेतन्य, । ते (१४) कूटस्थसज्ञ । जाण, बापा. ॥ ५२ ॥ जेसें घटावच्छिन्न । असे निर्विकार गगन, । तैसें कूटस्थ चैतन्य । विकाररहित. ॥ ५३ ॥ घटगत जळीं जेसें । आकाश प्रतिवि-

वित असे, । आणि चचलही दिसे । उपाधियोगें; ॥ ५४ ॥ तेंवि कूटस्थीं कल्पिली, । बुद्धि जे म्हणितली, । तीमाजी प्रतिबिंबली । जे का चिति, ॥ ५५ ॥ तया चिदाभासातें । (१५) जीव म्हणती सत. । ससारी तो निश्चित । बोळख तू. ॥ ५६ ॥ आणि पचभौतिक, सविकार, । ओट हात शरीर, । हे क्षेम ऐसा निर्धार । शास्त्रीं केला. ॥ ५७ ॥ पुण्यपापलक्षणे । धान्यें याचां ठायीं, जाण, । सभवती; यास्तव म्हणणें । क्षेत्र यया. ॥ ५८ ॥ ऐशिया क्षेत्रातें । तो जाणें निरुतें, । तो (१६) क्षेत्रज्ञ; ऐसा सकेत । वेदांतींचा. ॥ ५९ ॥ जयाचिया सत्तेनें करणें । करिती विषयग्रहण, । परि करीना जो आपण । तो आत्मा साक्षी. ॥ ६० ॥ सूर्याचेनि प्रकाशें । प्राणिजात जैसें । स्वकर्मीं आपैसें । वर्ततसे, ॥ ६१ ॥ तयाचेनि पुण्यपापें । भानु जैसा न लिंपे, । तेंवि साक्षी चिद्रूप । अलिप्त सदा. ॥ ६२ ॥ जागृत्स्वप्नसुषुप्ती, । इया अवस्था येती, जाती; । परि अनस्यूत असे चिन्मूर्ति, । तो (१७) साक्षी जाण. ॥ ६३ ॥ आत्मा तो एकविध । असे स्वत सिद्ध; । परि जीवेशादि नामभेद । उपाधियोगें. ॥ ६४ ॥ आणि ईश्वर वसे सर्वांतरीं । तो मनआदि इंद्रिया नियमन करी; । वर्तवीतसे नाना व्यापारीं । कर्मानुसार; ॥ ६५ ॥ तोचि (१८) अतर्यामी ईश्वर; । शरणागतासि रक्षी निरतर; । तया जाणता भवसागर । बोहटे, गा. ॥ ६६ ॥ आता परिसा सावधान । प्रत्यगात्म्याचें चिन्ह. । शास्त्रसमत सागेन । निष्क्रियापरी. ॥ ६७ ॥ देहींचि आमता मानी, । जो कर्तृत्वादिकाचा अभिमानी, । तो बोध कथिला शास्त्रज्ञीं । त्वपदवाच्यार्थ. ॥ ६८ ॥ देह आणि करणें । याहूनि मी विलक्षण, । साक्षी, ऐसा जो बोध पूर्ण, । तो त्वपदलक्ष्यार्थ. ॥ ६९ ॥ एव देहादिसाक्षी आत्मा, । बोधरूप (१९) प्रत्यगात्मा. । प्रत्यङ्मुखें पातला स्वधामा । म्हणानिया. ॥ ७० ॥ आता तत्पदार्थविवरण । सागू (२०) परमात्मयाचें लक्षण, । जयातें घ्याती योगीजन । सोहभाव. ॥ ७१ ॥ सकळ जगाचें कारण । जें सर्वज्ञत्वादि गुणसपन्न, । सर्वसाक्षी चैतन्य; । तो तत्पदवाच्यार्थ. ॥ ७२ ॥ विविधोपाधिरहित, । विशुद्ध, विश्वातीत, । तें चैतन्य जाण निश्चित । तत्पदलक्ष्यार्थ. ॥ ७३ ॥ उभयत्र वाच्यार्थत्याग । करूनि, घेतां लक्ष्यार्थ

चांग, । मग अखंडैकरस, । अभंग । ( २१ ) आत्मा जाणवे. ॥ ७४ ॥ जो स्थूल ना रोड, । साना ना वाड, । तो आनंदकद, अखंड, । विशुद्ध आत्मा. ॥ ७५ ॥ पदार्थशोधनपूर्वक । चिंतितां वाक्यार्थ सम्यक, । देशिकप्रसादें साधक । ब्रह्मचि होय. ॥ ७६ ॥ एवं साक्षात्कार जालिया । मग कैची, रे, माया? । शब्दार्थ विचारिलिया, । ते नाहीं ऐसा भाव. ॥ ७७ ॥ हे असत् म्हणों, तरि भासे; । सत् म्हणों, तरि नासे; । जरि म्हणो सदसत् असे, । तरि तें विरुद्ध. ॥ ७८ ॥ यालागीं अनिर्वचनीया । शास्त्रीं बोलिजे ( २२ ) माया; । जाण निश्चयें, "शिष्यराया, । विवेकी तूं. ॥ ७९ ॥ केलिया अनेक उपाय । माया नाशिली नवजाय. । ईचा प्रबळ विरोधी होय । विवेकुचि. ॥ ८० ॥ जववरि विवेक नसे, । तंववरि हे भासे; । विवेक उदेजतां नासे । मिथ्या म्हणूनि. ॥ ८१ ॥ कल्पिताचा नाश होणें, । जें अधिष्ठानमात्र उरणें । यावांचूनि होणें, जाणें । असेचिना. ॥ ८२ ॥ सर्वाधिष्ठान, निष्कंप, । मायाविनिर्मुक्त, निर्लेप । आत्मा सच्चिदानंदस्वरूप । वर्णिती वेद. ॥ ८३ ॥ सत्, चित्, आनंद । ऐशीं हे तीनि पदें; । परि आत्मा नव्हे त्रिविध । येकरूप तो. ॥ ८४ ॥ अनृत, जड, दुःखात्मक । प्रपंच हा देख; । याच्या व्यावृत्तीनें सच्चित्सुख । आत्मा प्रतिपादिला. ॥ ८५ ॥ प्रपंच अनित्य, कल्पित; । आत्मा काळत्रयीं अबाधित; । येक असे शाश्वत, । यास्तव सद्रूप म्हणिजे. ॥ ८६ ॥ जग जड हें, ज्ञानरहित, । नेणे आणिका पैं आपणातें. । जडव्यावृत्तीनें आत्मयातें । म्हणती चिद्रूप. ॥ ८७ ॥ सर्व दुःखाचिये समाप्ती । आनंदमय आत्मा प्रतिपादिती; । परि हे तीनि नामें नव्हती । आत्मयाचीं. ॥ ८८ ॥ स्वजातीय, विजातीय, स्वगत, । भेदत्रयरहित । परब्रह्म निश्चित । स्वानुभवें तूं. ॥ ८९ ॥ तुझे प्रश्न अवघे । सांगीतले तुज बरवे; । आतां मनीं न धरावे । संशय कांहीं." ॥ ९० ॥ ऐसें परिसूनि गुरुवचन । शिष्यें केलें साष्टांग नमन. । मग कर जोडूनियां स्तवन । मांडिलें प्रेमें. ॥ ९१ ॥ "अविद्येचिये निदें । वोसणत होतों अहंममशब्दें; । तो मी चेवविला स्वानंदें, । कृपानिधि. ॥ ९२ ॥ गेले संशयविपर्यय; । आत्मा अज, अव्यय, । जाणितला अद्वय; । हा प्रसाद तुझा. ॥ ९३ ॥ जयातें वर्णितां, श्रुति । 'नेति, नेति' म्हणौनि मौनावली, ।

तें ब्रह्मचि मी; ऐशी प्रतीति । आली मज. ॥ ९४ ॥ पाहतां कल्पित-भूषण । दिसे एकचि सुवर्ण; । तेंवि निलोकितां जग सपूर्ण । परमात्मा असे. ॥ ९५ ॥ मीचि परमात्मा, ईश्वर; । मीचि झालों चराचर; । मज-विना कांहीं दुसरें । नाहीं वस्तु. ॥ ९६ ॥ श्रीगुरुप्रसादें । पावे साधक आत्मपद, । येविषयीं विवाद । कांहीं नाहीं. ॥ ९७ ॥ श्रीगुरूचें महिमान। न वर्णवे वचनें; । म्हणौनि मियां नमन । केलें येकभावें." ॥ ९८ ॥ ऐशी प्रश्नोत्तरमालिका । गुफिली यथामति, देखा. । समर्पूनि श्रीगुरुपादुकां । पू-मावें. ॥ ९९ ॥ नाहीं मज पांडित्य, । आणि न कळेचि साहित्य; । सतीं कृपेनें अगत्य । न्यून तें पूर्ण करावें. ॥ १०० ॥ आश्रित दुबळाचिये प्रस्तीं । वेंचिजे पदरींचें धन श्रीमतीं, । तेंवि कृपा करावी सतीं, । वीरेश्वर विनवितुसे. ॥ १०१ ॥

---

# ४ गजेन्द्रमोक्ष.

(नारायण.)

श्रीमंगलप्रद गणाधिप सौख्यदाता,
ज्यातें सदा स्मरतसे हृदयीं विधाता,
तो मी नमीं सकलकारण, पुण्यराशी,
जो पूजिताचि अति सत्वर विघ्न नाशी.
विघ्नाद्रितें ढकलुनी रगडी रदानें,
कुंभद्वयीं निलसती अतिरम्य दानें,
जो डोलतो गणपती बहुसा मदानें,
आर्धी तयासचि नमीन मि निर्मदानें.

पद.

जय जय मंगलकर गजवदना,
जनपालन, सज्जनहृत्सदना. ॥ ध्रु० ॥
दिनमणिशतकोटिरुचिसमरूपा,
दीनदयाळा, अमितप्रतापा. ॥ १ ॥

पाशांकुशरदनायुधधरणा,
शेषविभूषण, सकटहरणा. ॥ १ ॥
कासे वसन शशिद्युति, सुंदर,
वासवनुतपद, शक्तिमनोहर. ॥ २ ॥

त्यानतरें मी निनवीन वाणीः । सुचे मला रम्य नवीन वाणी.
स्तोत्रात्मिका तेचि विरिंचिमामा । भक्तांसि देते अचिरेंचि भा, मा. ४.

हंसासना वदिन वेदमाता; । जीच्या प्रसादें स्फुरताति माता,
ते शारदा देवि जगत्प्रधाना । आली दयेनें मज सन्निधाना. ५.

पद.

वाणी, वंदितसें तुजला. ॥ ध्रु० ॥
बालक मी लडिवाळ तुझें गॅ, पालन करिं मजला. ॥ १ ॥
माये, तव महिमा न समाये । त्रैलोक्यीं भरला. ॥ २ ॥
सारासारविचार पहातां । तारक तू सकळां. ॥ ३ ॥ ६.

श्रीसद्गुरू वंदिन येकभावें, । गेली भवभ्रांति जया प्रभावें.
केली दया, बोध फळासि आला, । आनद तेणें हृदयासि झाला. ७.

पद.

नमन करूं गुरुराजदयाळा, । सुमनसुमन ठेवुनि पदयुगळा. ॥ ध्रु० ॥
अज्ञानांधकतम परिहरि जो । सुज्ञानांजन घालुनि डोळां, ॥ १ ॥
नावरुपातित वस्तु अगोचर । दावितसे, अति अद्भुत लीळा, ॥ २ ॥
ताराया ससारसमुद्रीं । नारायणविभुवर अवतरला. ॥ ३ ॥ ८.

विमलकमलनेत्रा, विश्ववद्या, मुकुंदा,
मुरहर, मुनिगेया, चिद्घनानदकंदा,
जय जय जगदीशा, केशवा, भक्तपाळा,
तव चरित वदाया स्फूर्ति देई, कृपाळा.

पद.

कौस्तुभधर, कस्तुरिकाभाला, कंसांतक, अविनाशा, ॥ २ ॥
नारायण, निगमागमसारा, न कळे महिमा शेषा. ॥ ३ ॥ १०.

ऐका एकाग्रचित्तेंकरुनि हरिकथा. हे असे निश्चमाता,
नाशी पापा समस्ता, परमसुखकरी, क्लेश जाती दिगंता,
वारी संसारचिंता, विषम उकलनी जन्मकर्मादि गुंता,
पावे श्रीकांत पूर्ता, सहज दृढ चढे मुक्तिसायुज्य हाता. ११.

'श्रीकांतें गजशक्र नक्रवदनीं संग्रस्तता तारिला,'
ऐशी भागवतीं कथा शुकमुनी जे संस्कृतें बोलिला,
जे आकर्णुनिया परीक्षिति मनीं लाभे सुखें सततें,
ते मी सांगतसें तुम्हांसि, परिसा, भाषांतरें प्राकृतें १२.

इंद्रद्युम्न म्हणूनि पांड्यविषयीं झाला भला भूपती,
ज्याचा धाक धरोनि अन्य नृपती चित्तीं सदा कांपती,
जो अत्यंत उदार, शूर, सकला पाळीतसे सज्जना,
ध्यातो हृत्कमळीं अहर्निशि रमानाथा, जगत्कारणा. १३.

पद.

नृप तो साजला, माजला, रिपुनिकरिं गाजला. ॥ ध्रु० ॥
इंद्रद्युम्न विराजे, ज्याच्या धाकें कांपति राजे. ॥ १ ॥
निरुपम भासे जगती, ज्यातें देखुनि सकलहि जगती. ॥ २ ॥
देत असे धनदानें, नाहीं दिधलीं जें धनदानें. ॥ ३ ॥
पाळन करित जनातें, दृढतर रत जो हरिभजनातें. ॥ ४ ॥
धीर, उदार जयाचे गुणगण शोभति दिग्विजयाचे. ॥ ५ ॥ १४.

हरीविना देव दुजा न जाणे. । तन्नामसंकीर्तन फार माने.
सर्वोपचारेंकरुनी हरीचें । करी सदा पूजन भूप साचें. १५.

पद.

पूजा करिताहे, राजा पूजा करिताहे. ॥ ध्रु० ॥
पूजा करि करि वोजा मजसम दूजा जगतींत कोण म्हणूनी, ।
कंजाक्षप्रियरंजित ऐशा कंजाक्षांच्या माळा घालुनि. ॥ १ ॥

ध्यानादिक विधि नानापरि हरि मानाया बहु मानी नृपती. ।
ज्ञानाधिक सुमनीं सुमनें जनीं वानाया निजगुणगणसपत्ती. ॥ २ ॥
वीरामेसरराजित बहुविध नीराजननैवेद्यादपरी ।
अर्पण करुनि समर्पक लक्ष्मीनारायण सोळहासोपचरी. ॥ ३ ॥ १६.

एके दिनीं नृपति पूजुन केशवाचें
भावें करूनि, हरिनाम जपोनि वाचे,
ध्यानीं अचचळ बसे, तव त्या नृपाळा
भेटावयास मुनिमान्य अगस्त्य आला. १७.

पद.

जेणें गिरिवर निजवीला, । उदरीं दानव जिरवीला, ।
उदधि अपोशनसम प्याला, । तो मुनि तव आला. ॥ १ ॥
नंजती सुरवर वरदाला, । त्याजि जो या भवनिभनाला, ।
पूजी भावें सांवाला, । तो मुनि तव आला. ॥ २ ॥
वारी राक्षसनिवहाला, । तारी जो निजभजकाला, ।
नारायण विभु मनिं ज्याला, । तो मुनि तव आला ॥ ३ ॥ १८.

जेशा त्या रजताचळाग्रीं लता चामीकराच्या भल्या,
तैशा दीर्घ, अपार, दिव्य मुनिच्या माथा जटा शोभल्या.
पायीं सुंदर पादुका, कटितटीं एणाजिनातें धरी,
लोकीं पातकि मानवास आपुल्या जो दर्शनें उद्धरी. १९.

समीप येता मुनिमान्य तो जन । ध्यानस्थ राजा नुघडीच लोचन,
बेसे, तयातें द्विज पाहुनी भरा । क्रोधें महाव्याप्त, फिरोनि चालिला. २०.
बोले, "गजाचेपरि मस्त होशी, । नेत्रद्वया झाकुनि बैसलासी.
नृपोत्तमा, त्यागुनि या वपूसी । वनांतरीं तू गजजन्म घेशी. २१.
भूदेव देवांमिहि मान्य, आदरें । करी हरी पूजन आमुचें बरें;
ऐसें करूनि स्मरणासि टाकिलें, । भूपा, तुझें ध्यान असें कसें भलें? २२.

पूर्वींही नहुषनिशवु नृपती, जे थोर नामाथिले,
वेगीं विप्रअनादरेंकरुनिया ते दुर्गती पावले.
तूही क्षत्रिय फार गर्व करिशी, भूपा तयाचेपरी.
शेखीं जन्मसि दंतियोनिस." असें बोलोनि गेल्यावरी २३.

झालें वृत्त अमात्य सांगति नृपा, 'गेला मुनी शापुनी.'
ऐसें ऐकुनि धांवला मग तयामागें भयें कांपुनी.
साष्टांगीं नमुनी तदा वदतसे, "चित्तीं दयेतें धरीं,
अन्याय क्षमिजे, असे न कळता जाला, मला उद्धरीं. २४.

मी बाळ फार लटिवाळ तुझें, दयाळा.
अन्याय तू न धरिं, रे, हृदयीं, सुशीला.
माता सुतावरि जरी करि पूर्ण कोपा,
वाचेल काय मग बाळक, मायबापा! २५.

पद.

तारिं तारिं, दयाल, या. ता प्राशिलें वरुणालया. ।
अन्य तुजविण कोण मज करि धन्य, तारुनिया भया? ॥ १ ॥
राग हरिं, अनुराग करिं मज राजयावरि लौकरी; ।
राजर्षि उ.शाप देउनि, रक जाणुनि उद्धरीं. ॥ २ ॥
इंदिरामय मंदिरा मम येइ, गा, प्रभु, सत्वरें. ।
चंदनादिककुदवृंदि मि पूजितों अति आदरें." ॥ ३ ॥ २६.

नृप तया निनवी बहुतां रिती. । परतली मुनिची मति तारिती.
सदय होउनियां, मग, "वैखरी," । वदतसे, "दृढ ऐक, नृपा, खरी. २७.

विप्राचा शाप कांहीं, समज निजमनीं, व्यर्थ होणार नाहीं.
केली म्यां जाण, भूपा, निरखुनि तुझिया प्रार्थनेला कृपा ही.
होसी दंती वनांतीं, स्मरशिल हरिला, पूर्वजन्मांतरींचें,
चित्तीं होईल तूतें स्मरण, मग वरीं मुक्ति; हें वाक्य साचें." २८.

येणें रीती वदूनी, झडकरि मग तो चालिला स्वाश्रमाला.
राजा गेहासि आला, नमुनि मुनिवरा पावुनि विश्रमाला.
शापाची प्राप्ति झाली म्हणुनि नरपती खेद पावोनि भारी,
वैराग्यें चित्तवृत्तीप्रति करित असे बोध येणें प्रकारीं. २९.

पद.

"हरिविणे तुझें कवण । हरिल, बो, दुःख? जाण,
जाइं तयालागिं शरण, । मना, सदा. ॥ १ ॥

दारा, सुत, गेह, धन, । कुणाचें, बा, हे कोण ?
शाश्वत निरंजन, । मना, सदा. ॥ २ ॥
असार, पहा संसार, । दुःखाचाचि सागर,
करिं, गा, याचा विचार, । मना, सदा. ॥ ३ ॥
नारायणविभू तूज । तारिल, जो, त्यासि भज,
सांगाती तोचि नीज । मना, सदा. ॥ ४ ॥ ३०.

संसार शाश्वत म्हणूनि असें न मानीं.
टाकूनि यासि सुख पावसी थोर मानीं.
याकारणें हरिपदांबुजचिंतनातें,
चित्ता, करीं, गमत शाश्वत हेंचि मातें. ३१.

दारासुतादि धनगेह म्हणोनि, चित्ता,
स्वीयत्वबुद्धि धरुनी, तुज व्यर्थ चिंता.
काळेंकरूनि घडिमोडि समस्त लोकीं
होते, विवेकविभवें बरवें विलोकीं. ३२.

पद.

त्याला सुख लाधे, सुख लाधे, । परपद सत्वर साधे. ॥ ध्रु० ॥
हरिपदिं लावुनि चित्ता, । चुकवी भवविभवाची चिंता, ॥ १ ॥
सांडुनि विषयीं वाञ्छा । निशिदिनिं भजनीं ज्याची इच्छा, ॥ २ ॥
जो नत गुरुचे चरणीं, । सज्जन वानिति ज्याची करणी, ॥ ३ ॥
ममताहङ्कृति टाकी, । कामक्रोधादिक रिपु जिंकी, ॥ ४ ॥
नारायणविभु सेवी, । आत्मानंदीं रति अति ठेवी." ॥ ५ ॥ ३३.

स्थापूनि स्वसुतासि राज्यविभवीं, राजा वना चालिला.
तेथें फार करूनिया तप, नृपें आत्मा सदा शोषिला.
जाला तो नवजाय शाप मुनिचा. देहांत झाल्यावरी
जाला त्या करिजन्म. कोण घडल्या कर्मासि पैं आवरी ? ३४.

पद.

ऐशी तव लीला, तव लीला, । जलधररुचिसमनीला. ॥ ध्रु० ॥
जें जें तुज मानवलें, । तें तें सहजीं सहजचि होतें, ॥ १ ॥

मतिगुणवित्तविहीना । करिसी सर्वजनोत्तमराणा; ॥ २ ॥
पापी पतित जनासी । येक्या भक्तिनें मुक्तिसि नेसी; ॥ ३ ॥
रचिसी सर्वहि खेळा, । परतु नाहोसी लिप्ताळा, ॥ ४ ॥
नारायणनिभु, देवा, । तूझा महिमा कवणा ठावा? ॥ ५ ॥ ३५.

"राजा तो करिजन्म पावुनि असे कोण्या स्थळीं राहिला ?
तो सांगें मज सर्वही, मुनिवरा, वृत्तात जो जाहला."
त्याची ऐकुनिया अशी मृदु गिरा, वोले तया, "आइकें,
चित्ता स्वस्थ करीं, परीक्षितिनृपा," हें बोलिजेलें शकें. ३६.

तरग ज्यामाजि अपार रगती, । येऊनि काठीं ऑदळूनि भंगती, ।
सो क्षीरसिंधु ध्वनियुक्त जो भला, । तया तरगीं गिरिराज शोभला. ३७.

ज्याचीं काचनरौप्यलोहशिखरीं शोभा विकासे महा,
जेथें वाहति निर्मलोदक नद्या सपूर्णसतापहा,
ज्याची आयुत योजनें मिरवते उची, तसा रुदही,
वाटे विस्मय तो त्रिकूट बवता, ज्या साम्यता ही नही. ३८.

रत्न, धातु जयासि मडण, विविध तरुगण शोभती,
किन्नरादि मरुद्गणासह सिद्ध जेथ विहारती,
करिति ते गधर्व, गुह्यक गायना वहुता रिती,
सिंहगर्जन म्हणुनि त्याप्रति सिंह रोषित गर्जती. ३९.

सुशोभला तो गिरिवर लोचनलोभनीय वीलासें,
जोहि भला रमणीयमणींसह काचनकाति विकासे. ४०.

विंध्यमंदरा लाजविता जो त्रिकूटनामक भारी,
अयुत योजनें रुद, उचही, शृगीं गगन उभारी. ४१.

शुकपिक कलरव अनुदिनिं करिती, मानुनि सभ्रम रानीं.
पुष्पित तरुवर साजति अगणित, सेवित जे भ्रमरानीं. ४२.

सरिताओघ अमोघ वहाती, विमल असे जल ज्याचें,
मच्छकच्छपीं विलास, तेथें काननहीं जलजाचें. ४३.

उपवन वरुणाचें तेथ शोभे विशेषें;
वसति अमरनारी येउनी चित्ततोषें.

कुसुमित फलभारीं डोलती वृक्ष थाटें,
निरखुनि नयनांतें वाटतें सौख्य मोठें. ४४.

जंबू, बिल्व, कपित्थ, आम्र, कदली, पुन्नाग, मंदारही,
नीप, प्लक्ष, कदंब, चंपक, अशा वृक्षीं विराजे मही;
नानागुल्मलताविमानयुत त्या देखोनियां कानना,
वाटे साम्य जयासि नंदनवनावांचूनियां आन ना. ४५.

तेथें येक असे सुनिर्मल जलें संपूर्ण, ज्या अंतरीं
कल्हारें, कुमुदें, अनेक कमळें, नीलोत्पलें साजिरीं;
पक्षी त्यांवरि बैसले, जळचरीं जें सेविलें निर्भरें,
वाटे देखुनि तें सरोवर मनीं आनंद पैं विस्तरे. ४६.

त्याचे तिरीं मल्लिका आणि जाती । महापुष्पभारें सदा डोल देती.
पहा पद्मकतूही विराजीत कैसे, । जनांच्या मना देखतां सौख्य पैसे. ४७.

ऐसिया वनीं नृपशिरोमणी । द्विरद जाहला, शाप लाधुनी.
तेथ अनुदिनीं वृद्धि पावुनी । फिरतसे महा मस्त होउनी. ४८.

अंजनाद्रिसा चित्र तो दिसे, । साम्य पाहतां दिग्गजीं नसे.
निरखुनी तया भीति लाहुनी । पळति दूरुनी श्वापदें वनीं. ४९.

वेष्टिला असे बहु करेणुंनीं, । धांवतां भरे गगन रेणुंनीं.
कळभही तयासह; जनां कसे । दिसति वारिदांपरि अनेकसे. ५०.

गर्जूनियां भीम घनस्वरानें, । मोडीतसे भूरुह पुष्करानें.
ऐशापरी तो गजराज रानें । फिरे महामस्त सदा भरानें." ५१.

कथा अशी ऐकुनियां शुकाननीं, । परीक्षिती प्रश्न करी तदा. "मुनी,
गंधर्व तो नक्र कसा जलांतरीं । जाला, वदा, जो निजवृत्ति अंतरीं." ५२.

हूहूनामक थोर येक गगनीं गंधर्व नागाधिला,
बाहूराजित वाजवीत विविधा विणास्वरीं माजला.
लाहूनि बहुमान इंद्रभुवनीं तो येत येतां भला
पाहूनि जनपावना, त्रिपथगा, गंगानदी पातला. ५३.

पद.

माधव वरा । माया मिथ्या मानुनियां मानसीं स्मरा, जनहो. ॥ ध्रु० ॥
तनुमनधन अर्पुनि तच्चरणीं ।
तमहरसुतदुतदमन करा. ॥ १ ॥
विषय विषम समजुनि निज अंतरिं, ।
विरति धरुनि, निज मुक्तिसि वरा. ॥ २ ॥
नानाजपतपसाधनश्रम कां? ।
नारायणविभु स्मरण करा. ॥ ३ ॥ ५४.

पद.

हरिभजनीं मन लावा केवळ, । विषय विषासम समजुनि सकळ. ॥ ध्रु० ॥
दानयज्ञादिक बहुधनसाधक । ध्यान केल्या पावे दिनदयाळ. ॥ १ ॥
नामशक्ति करिं घेउनियां दृढ । कामक्रोधरिपु जिंका प्रबळ. ॥ २ ॥
नारायणविभु भावें नमुनी । नरदेह दुर्लभ करा सफळ. ॥ ३ ॥ ५५.

तों तेथें द्विजवर्य देवलमुनी स्नानार्थ आला पहा.
क्षाळी वस्त्र, तदा पडे चहुकडे वारी, विराजे महा;
गंधर्वावरि येक बिंदु पडतां, सिंदूरवर्णापरी
रोषें नेत्र करोनि, बोलत महा घोषोनि नीचोत्तरीं. ५६.

गंधर्वा गर्व ताठा. म्हणत, "द्विजभटा बोखटा थेंबुटा कीं
वस्त्राचा टाकिला तां मजवरि, स्फुट जो पुण्य नासोनि टाकी.
घोकी अर्भाट लोकीं करिसि नुमजतां, भाससी भ्रष्ट मोठा,
पोटासाठीं पुराणें कथिशि घटपटा पाहुनी ग्रंथ मोठा." ५७.

गंधर्व बोले. मुनि तो तटाकीं । उभा असे; त्या ढकलूनि टाकी
गंगाजळीं; खोल तळीं रिघाला, । जाला तयालागुनि थोर घाला. ५८.
सांवरूनि मग तो ऑपणाला, । बोलिला मुनि करूनि पणाला.
"बुद्धि हे तव महामकराची; । पावशील तनु तू मकराची. ५९.
ढकलिलें मजलागें जलांतरीं, । म्हणुनि तेथचि वास निरंतरीं,
करिसि तू; न चुके मम शाप हा. । सुसरिची तनु हो तुजला, पहा. ६०.

केला तुवां व्यर्थ कळीस ठाव कीं, । हे स्थीति ऐसी सकळांस ठावकी.
स्वशुद्धि नाहीं तुजलागिं, गावणा. । होसी क्रियानष्ट महाधिगावणा." ६१.

ऐसा ऐकुनि शापबोल मुनिचा, गंधर्व तो अंतरीं
धाके फार विचार मानुनि म्हणे, 'शापासि या आंवरी,
ऐसा कोण असे? भया हरुनिया सौख्यासि पैं छाहिजे,
आतां मुख्य हरीच थोर; विनयें हा प्रार्थिला पाहिजे. ६२.

## पद.

पतीतपावना, मज तारीं, बो शौरी. ।
स्वामी तुजविण भवभय हें कोण हरी? ॥ ध्रु० ॥
आशानदि बहु थोर असे दुस्तर,
मनोरथतोयपूर येती अतिनिर्भर,
काम, क्रोध, मद, मान महामकर,
मोहपंकीं पडुनि बुडतसें, पाववीं पार. ॥ १ ॥
अतिमित्र वाटताति मज दुर्जन.
दुष्ट वाक्यें ऐकावया माझे सावध कान.
परकांता पहावया तत्पर नयन.
स्वामी, क्षणभर तुझें ध्यान न करी मन. ॥ २ ॥
कटाळलों निरंतर फिरूनि वणवण.
मायबाप तूंचि म्हणुनियां आलों शरण.
नारायणविभु, चुकवीं जननमरण,
स्वामी, दावुनियां संतोष, देईं त्वच्चरण. ॥ ३ ॥ ६३.

## पद.

दीनजनपालका, रे, । रमानायका, दीनजनपालका, रे. ॥ ध्रु० ॥
भवताप हा साहवेना. सांगूं आतां, स्वामी, कवणा? ।
मायबाप तूं धावे लौकरि, करिं आतां करुणा. ॥ १ ॥
बाळक तुझें लडिवाळ, कोप मनीं, स्वामी, न धरीं. ।
अन्याय सर्व सोसुनियां, अति सत्वर तारीं. ॥ २ ॥

नारायणविभु, तुजविण कवणा । जाऊं मी, स्वामी, शरणा? ।
करुणापांग पाहुनियां करिं मज रक्षणा. ॥ ३ ॥ ६४.

पद.

देवा पावें वेगीं मजला. ॥ ध्रु० ॥
तारक तूं मायबाप म्हणोनी शरण आलों तुजला. ॥ १ ॥
संसारीं सुख नाहींसें कळुनी, ध्यास तुझा धरिला. ॥ २ ॥
नारायणविभु, करुणासागरा, तारीं, हरि, दयाळा. ॥ ३ ॥ ६५.

बोलिला नमुनियां मुनिपायीं, । "तारिं, तारिं मजलागिं उपायीं.
शाप हा तव अनावर लोकीं । तो हरूनि सदया अवलोकीं. ६६.

गंगा पाप हरी; शशी परिहरी संताप; कल्पद्रुमु
दैन्या दूर करी; तयांहुनि महा हा थोर सत्संगमु.
जाई पाप अपाप, तापहि तसा, दे इच्छिली संपदा,
ऐसा संग घडोनिही तव, मुनी, हे कां मला आपदा, ? ६७.

सज्जन संगम तो । तारक बहु गमतो. ॥ ध्रु० ॥
दुस्तर हा भवसिंधु तराया सत्पथ कीं अवलीला.
स्वस्तिक्षेम करी संसारीं, लावुनियां निज माळा. ६८.

करितां सहजीं सोय तयाची, मोहपिसें दुरि पळतें;
धरितां बोध तयाचा चित्तीं, कवण मि ऐसें कळतें. ६९.

कामक्रोधमदादिक मत्सर यांचा थारा मोडी,
नामस्मरणीं रति अति होउनि नारायणविभु जोडी." ७०.

ऐशा गंधर्वबोला परिसुनि मुनि तो तोषला, रोष गेला.
जाल्या शापासि हेलाउनि, मनिं रचिला यत्न संरक्षणाला.
"गंधर्वा, मर्वसा हा दृढ धरिं हृदयीं, सर्वसाक्षी हरीच्या
चक्रें नाशोनि, पूर्वापरि तनु धरिशी संगतीनें करीच्या. ७१.

पद.

भावें श्रीहरि गायें । वरवें० ॥ ध्रु० ॥
मायिक हे तनु मानिं अशाश्वत, । मानासिं माधव ध्यायें. ॥ १ ॥
स्वार्थ धरूनि यथार्थचि हा भव । व्यर्थचि मानिसि कायें ? ॥ २ ॥
भक्ति करूनि विरक्ति धरीं दृढ, । मुक्तिपदाप्रति जायें. ॥ ३ ॥
संसाराब्धि तरायालागुनि । समजें हाचि उपाये. ॥ ४ ॥
अंतरहित अनंतशय्याप्रति । अतरसी 'हा! हाय!!' ॥ ५ ॥ ७२.

पद.

रामनाम जप, रे, । सखया. ॥ ध्रु० ॥
दुसरें साधन या युगिं नाहीं, । हेंचि सुलभ तप, रे. ॥ १ ॥
नारायणविमुख्यान करी जो । त्यासि कसें सुख रे ?" ॥ २ ॥ ७३.

ये रीती मुनि बोलिल्यावरि, तया हूहू त्रिकूटाचळीं
जाला खोल सरोवरीं मकर तो; विक्राळ दाढावळी.
तेथें पावुनि वृद्धि तो अनुदिनीं मोठा कठोराकृती,
पाहूनी जळजंतु सर्व पळती राहे स्वतंत्रस्थिती. ७४.

" ऐसे पावुनि शाप भूप आणि तो गंधर्व दोघे कसे
जाले मुक्त ? सविस्तरें मज कथीं." राजा मुनीला पुसे.
"राहे तो गजराज थोर गहनीं; तो नक्रही जीवनीं;
ते तूं ऐक कथा, नृपा." म्हणुनियां सांगे तयाला मुनी. ७५.

एके दिनीं वांछुनियां जळाला । सरोवरातें गजराज आला.
पिपासिताशांति करी, सगोडी । सरोरुहांतें सहजेंचि तोडी. ७६.

असा जंव करी करीं परम खेळ नानापरी,
तळीं रिघुनियां बळी नितळता जळें लौकरी,
तदा मकर पावला, निरखतांच झेंपावला,
बळेंचि दृढ ओढिला, गजवजोनि केला ढिला. ७७.

नयेचि तेथें दृढ गोंविला पती, । करेणु देखोनि असें विलापती.
भयें पळाल्या बहु दूरि, कां पती, । दुःखेंकरूनि हृदयांत कांपती. ७८.
सुहृद, आप्त, सखे बरवे तया । त्यजुनि ते पळती गजराजया.
प्रबळ येउनि जैं विपदा वरी, । तंव तयाप्रति कोणि न सांवरी. ७९.

बऱ्या काळीं बंधूजन सकळही सोय धरितीं.
विपर्यासीं, माझा म्हणुनि मग कोण्ही न वदती.
तशा काळीं काळीरमण हरि पाळील, सखया.
वरें वेळोवेळीं हृदयकमळीं तूं भज तया. ८०.

योढी बाहेर काढी गज चरण बळें, नक्र त्याला न सोडी.
फोडी हांका, न कांहीं स्मरण, मग तदा आपटी सोंड तोंडीं.
नक्राच्या वक्र दाढा तिखट, वळकटा, पाणियामाजि मोठें
वाटे; याच्यागि पाहे, बळ बहुत करी, बोढिता होय नेटें. ८१.

परस्परें वोढिति, वैर भाविती, । धरोनियां धैर्य बळासि दाविती,
बलाढ्य दोघे न कदापि भागती, । स्थिरावती आणि तसेच मागुती. ८२.

ये रीती गज, नक्र ते उभयतां क्रोधें बळें भांडती.
जाले वत्सर ते अनेक शतशा, नाहीं तयांची मिती.
जाला तो द्विरदाधिराज परम क्लेशी, क्षुधा अंतरीं
बाधी, यास्तव रोड दुर्बळ दिसे, संतप्त दुःखज्वरीं. ८३.

हरिविण अजि माझें दुःख हें कोण वारी?
सदयहृदय भावें चिंतिजे दानवारी.
तरिच सकल नासे पाप जन्मांतरींचें;
म्हणुनि समजलें पैं चित्त तेव्हां करीचें. ८४.

हरिनारायणावीण । समयीं रक्षिणार कोण?
तोचि भक्तपरायण, । भावें जावें तया शरण. ॥ ध्रु० ॥
दैत्यनाथें स्वतनयातें । पीडियेलें शस्त्रघातें.
सिंहरूपें वधुनी त्यातें । रक्षियेलें प्रल्हादातें. ॥ १ ॥
शत्रुभ्राता बिभीषण । आला श्रीरामासि शरण;
लंका तयासी देऊन । रक्षीयेला अभिमान. ॥ २ ॥

द्रौपदीचें वस्त्रहरण । करितां दुष्ट दुःशासन,
देवें वस्त्रें बहु पुरवून । रक्षियेला तीचा मान. ॥ ३ ॥
ध्रुव केवळ बाळक, । भक्ति करितां निष्टक,
नारायणविभु तारक । ध्रुवपदीं स्थापी देख. ॥ ४ ॥ ८५.

श्रीकृष्ण जो दैत्यजनासि मारिता, । अनेक भक्तांप्रति होय तारिता,
दुःखें तयाचीं बहुसाल वारिता, । तयाविना ठाव नसेचि कीं रिता. ८६.

तयासि आता स्मरिंजे रमाधवा, । येकाग्रभावें, दृढ, दीनबांधवा.
म्हणोनियां होय गजेंद्र चिंतिता, । तो जन्मकर्मांप्रति होय जिंतिता. ८७.

## पद.

श्रीहरि आतां तरि मजवरि दया करी. ॥ ध्रु० ॥
जन्मेजयें बहु घेऊनि वेषासि । नाचतसे श्रम करोनि तुजपाशीं. ॥ १ ॥
पुरवीं सकळ मनोरथ तरी, । वेष घेवों नको म्हणुनि निवारीं. ॥ २ ॥
संसारचक्रीं भ्रमून । नारायणविभु तुज आलों शरण. ॥ ३ ॥ ८८.

अपार दुःखार्णव, खोल वारी, । न पाहवे, गा, मजला, मुरारी.
स्वनामनौका मजलागिं देईं. । तरेन मी सत्वर या उपायीं. ८९.

## पद.

जय जय मुरकंदा, सुखकंदा, । परिपालित मुचकुंदा. ॥ ध्रु० ॥
मच्छकच्छपरूपा । मधुमदभंजन, मुनिहृद्दीपा, ॥ १ ॥
वराहनरहरिनामा, । वामन, बलिमददमनोद्दामा, ॥ २ ॥
भृगुतनया, विश्रामा, । भूपति, भुविजावर, श्रीरामा, ॥ ३ ॥
कालियमर्दन कृष्णा, । हलधरअनुजा, हरिं भवतृष्णा. ॥ ४ ॥
बौद्धकल्किवेषा, । बुधनुत नारायण, सर्वेशा, ॥ ५ ॥ ९०.

अनंतशयना, हरी, त्वरित धांव, ये लौकरी.
जळीं मज जिवा, हरी, मकर फार कष्टी करी.
अपार दिन मी करी तवचि नाम चित्तीं धरीं,
नमीन तुज, पुष्करांकरुनि पूजितों, उद्धरीं. ९१.

नरहरि, मज पावें, भक्तपाळा, कृपाळा,
मुरहर, मुनिवंद्या, दीनबंधो, दयाळा.
झडकरि, करुणाब्धे, धांव, रे, धांव आतां.
भय परिहरिं माझें केशवा, श्रीअनंता. ९२.

## चूर्णिका.

दीनबंधो । पावें, सौख्यसिंधो. ॥ ध्रु० ॥ दीनबंधु, दयानिधे, मुनिकिन्नरस्तुत, वीनवाहन, दीन मी मतिहीन तव पदिं लीन होउनि विनवितों, हरी. ॥ १ ॥

काय करुं ! हा काय व्याकुळ. पाय सुसरी खाय. वोढित जाय सुसरीं. सोय सोडुनि सोइरे बहु भोय पळती. साह्य कोण्हि न होय. दुस्तर तोय फार. अपाय जाणुनि, हाय! हाय!! उपाय न दिसे. मायबाप तूं काय पाहसी? ॥ २ ॥

राव, राव, मि सावजें बहु घाव करुनी ताव हरिला. पूर्व समज अपूर्व गमतो. भर्वसा, सर्वोत्तमा, दृढ. पाव सत्वर, पावना. तव नाम तारक या वनीं मज. धांव, धांव रमावरा, हरि, हाव भाव तुं सर्व जाणसी. ॥ ३ ॥

धीर परि हा धीर न धरे. क्षीरपारावारशयना, पार पाववि, सारसाक्षा; थार दे पदसारसीं. दृढ सार हेंच. असार हा संसार दुर्घट घोर चुकवीं, धीर, शूर, उदार, गुणगंभीरवर, नारायणप्रभु. ॥ ४ ॥ ९३.

## चूर्णिका.

अंबुजोद्भवतात, अंबुजेक्षण, हरे, अंबुजालया, सुखांबुधि विहारा; अंबुदप्रभ, दिव्य, तुंबरादिकसेव्य, कंबुकंधर देव दंभरहिता; मंदरोद्धरण, हे मंदहसिताब्जमुख, सुंदराकार, मुचकुंदवंद्या; देवकीतनय, वासुदेवहृदयानद, देवदेवोत्तमा, वेदवेद्या; भक्तपालक, विभो, हरितत्रितापा; नक्तंचरदमन, अमितप्रतापा; मीनकेतनजनक, हे मीनरूपा; किन्नरादिकविनुत, हे चित्स्वरूपा. ९४.

वैकुंठाधिप, भक्तवत्सल, हरी, लक्ष्मीश, जो तारिता,
तो लक्ष्मीसह घेउनी निजकरीं फांसे असे खेळता,
सारीपाट तथाव थीकारि तदा ऐकोनियां ते ध्वनी.
"माझा भक्त विरक्त कोण ? कवणें केली," म्हणे, "जांचणी !" ९५.

ऐसें बोलुनियां हरी मग करीं घेवोनि चक्रायुधा,
जाला तो गरुडाधिरूढ, भजकां संरक्षितो जो सुधा.
शोभे कौस्तुभ, वैजयंती रुळती आपाद माळा गळां.
भावें चिंतन त्या करील, सकळीं तो धन्य दैवागळा ! ९६.

आला जेथ असे गजेंद्र मकरें पायीं मुखें नोंदिला.
त्यातें देखुनि दीनबंधु हरि तो 'मा भी' असें बोलिला.
"चिंताक्रांत अकांत कां करिसि तूं, वत्सा, मनीं कष्टुनी ?
माझें जें ब्रिद, भक्तवत्सल, जनीं तें सत्य मानीं मनीं." ९७.

दुःखार्त द्विरदाधिराज तंव तो बोभाय दीनस्वरें.
"वेगीं ये, हरि, आपदा हरिं." असें ऐकोनि देवेश्वरें,
आश्वासोनि तयासि, नक्रशिरसा चक्रें द्विखंडा करी
विश्वासोनि पदाब्ज वंदित असे विश्वंभराचे करी. ९८.

चक्रें नक्र विदारिल्यावरि, तदा शक्रादि ज्या सेविती,
ठेवी हात पहात त्यास सदयें माथां रमेचा पती.
होतां स्वस्थ करी, करें मग करी पूजा हरीची बरी.
बोले, "धन्य जगांत मान्य तुझिया झालों दयेनें, हरी." ९९.

पद.

हरि देखोनि हरिख तो वाटला. ॥ ध्रु०॥
भयवारी दानवारी येऊनि भेटला. ॥ १ ॥
लौकिकाचा संग काचा मग तुटला. ॥ २ ॥
बहु करि स्तुति करीं, कंठ दाटला. ॥ ३ ॥ १००.

जाली दया, दुरित तें निरसोनि गेलें.
येतां शरत्समय जेंवि दिगंतराळें,
जावोनि अभ्र मग तें, बहु शुभ्र होती,
दाटे अपार सुखसंभ्रम तेंवि चित्तीं. १०१.

स्तवुनियां परमेश्वर यापरी । गज तटस्थ उभा दृढ अंतरीं.
स्मरतसे रत होउनि माधवा, । परमशाश्वतसत्सुखवैभवा. १०२.

*त्यजुनि गजवपूसी जाहला दिव्यदेही.*
विलसति करिं चारी चक्र, अब्जें, गदाही.
दिसत हरिच ऐसा, कांस पीतांबराची;
निरुपम, शुभकारी मूर्ति भासे तयाची. १०३.

पद.

करिवर तो हरिरूपचि भासे. ॥ ध्रु० ॥
चिंतुनियां हरिचरण निरंतर । जिंकुनियां कलिकाळ उभासे. ॥ १ ॥
शंखचक्रधर, दिव्यशरीरी, । सुंदर ज्याची मूर्ति विकासे, ॥ २ ॥
निरुपम अद्भुत कांति जयाची, । शोभतसे पीतांबर कांसे, ॥ ३ ॥ १०४.

मकरहि मग जाला पूर्वगंधर्वरूपी.
नमन करुनि भावें, राग नाना आलापी.
हरि, तवकरचक्रें वक्रता आजि गेली,
परम सुखद ऐशी वेळ संप्राप्त झाली. १०५.

दाटे दुंदुभिनाद थोर गगनीं, आनंद देवां मनीं,
गंधर्वादिक सिद्ध, किन्नर, मुनी पुष्पीं हरी पूजुनी
स्तोत्रांतें करिती; "जगत्रयगुरो, तू रक्षिता येकला.
नादेखों तुजवीण अन्य दुसरा, चित्तीं आम्हीं रेखिला." १०६.

पद.

पावला हरिराज याला, । पतितपावन ब्रिरुद हें जयाला. ॥ ध्रु० ॥
पुंडरीकाक्ष जो, कुंडलेश्वरशयन, । चंडविक्रमहि दोर्दंड भारी; ॥ १ ॥
चक्र धरुनी करीं शक्रमंडित करी । वक्रदनीं महानक्र मारी. ॥ २ ॥

' मा भि मा भि' करी, कां भिसी! शडकरी। घे करींच्या करीं अभय माझें. ॥३॥
साभिमानी महागभीरख वंदत्त । मद्रूपासमचि हो रूप तूझें. ॥ ४ ॥
पार न कळेचि, आधार जो या जगीं, । सार वेदांतिचा महागोळा. ॥ ५ ॥
तारिता धरुनि अवतार नानाविधा, । आदिनारायणाधिप स्वलीला. १०७.

पद.

श्रीवर तो पाहिला आजि डोळां ॥ ध्रु० ॥
सुंदर सरसीरुहदललोचन । मंदरोद्धर सांवळा, ॥ १ ॥
कमनीयाकृति, भूषणमंडित, । वामांकीं कमला, ॥ २ ॥
नारायणविभु हृदयीं राहुनि । पाळन कारि सकळां; ॥ ३ ॥ १०८.

पूर्वी भागवतीं नृपाप्रति शुकें जे सांगिजेली भली,
ते आतां वर विश्वनाथतनयें नारायणें वर्णिली;
ऐसी हे 'करिराजमोक्षण'कथा; जे वाचिती, ऐकती,
त्यांचे पूर्ण करी मनोरथ सदा संतोषुनी श्रीपती. १०९.

आरती.

जय देव, जय देव, जय, जी गोविंदा,
भय वारीं, मज तारीं शडकारि, करिवरदा. ॥ ध्रु० ॥
सारसलोचन, श्रीधर, कस्तुरिकाभाळा,
मुरहर, मुनिजनवद्या, सुरनरपरिपाळा,
तारक सकळ जनां अवतार तुझा, विमळा,
मारजनक, कमळानन, दाखवि पद कमळा. ॥ १ ॥
मंगलदायक ऐशा देउनि सत्संगा,
रंगवि निजभजनीं दृढ करुणांतरंगा,
अगजकोटिनिभांगा, पदनिर्गतगंगा,
गंगाधरसुहृदा, देवा, श्रीरंगा. ॥ २ ॥
पारावारसुतावर, सर्वजनाधारा,
धाराधरनिभश्यामळ, सुंदर, सुकुमारा,
साराया तव स्तवनीं मति दे, दातारा;
नारायणविभु, निरुपम, निगमागमसारा. ॥ ३ ॥ ११०.

# ६. लघुबोध.

## ( मौनी. )

वत्सा, सांगतों मी ज्ञान. । ऐकें शुद्ध करोनि मन, । कळेल निजरूप निर्गुण. । विराग, भक्ति दृढ धरीं. ॥ १ ॥ अरे, तूं सच्चिदानंदसाक्षी । वस्तुतः असाक्षी. ॥ ध्रु० ॥ उठोनि उषःकाळीं लौकरी । आत्मविचार सत्वर करीं. । आयुष्य नरतनूचें निर्धारीं । सरतां पावसी भवदुःख. ॥ २ ॥ तनूचा साक्षी सच्चिद्घन । आत्मा केवळ तू निर्गुण. । साक्षित्वाची ही निजखूण । विरे तुझीच तुजमाजी. ॥ ३ ॥ आधीं साक्षित्व दृढ करूं, । मग या अभिमानातें हरूं । केवळ निर्विकल्प निर्धारु । तेंचि स्वरूप तुझें. ॥ ४ ॥ नव्हेसि देहेंद्रियादि मन, । नव्हेसि नरनारी तू जाण; । आत्मा साक्षी तूं चिद्घन, । जीवही नसशी, शिष्या, तूं. ॥ ५ ॥ त्रयदेहादिक पंचकोश । मिथ्या मायिक हें तव दृश्य; । याचा द्रष्टा तूं अविनाश । प्रत्यगात्मा, कूटस्थ. ॥ ६ ॥ प्रत्यगात्मीं जो अहंकार, । टाकोनि तोही जड शेजार, । त्यांचा प्रत्यक् तू निर्धार । प्रत्यगात्मा अतिशुद्ध. ॥ ७ ॥ तुझिया सत्तेनें जगत । सत्यासारिखें भासत; । तूं तर सत्याचें सत्य । म्हणूनि सद्रूप तूंचि. ॥ ८ ॥ कधीं मी आहे कीं नाहीं, । अशा न पडसी संशयीं. । अखंड असती अवस्थात्रयीं । म्हणूनि सद्रूप तूंचि. ॥ ९ ॥ असत्य देहासि निरसितां । आत्मा अविनाशी तत्वता, । सर्वहीं काळीं निर्बाधता । म्हणूनि सद्रूप तूचि. ॥ १० ॥ तुझिया ज्ञानें ज्ञानमय, । देहेंद्रियादि जडमय, । सर्वहीं भासती हे चिन्मय । म्हणूनि चिद्रूप तूचि. ॥ ११ ॥ नसतां ज्ञानरूप तू साचें । देहेंद्रियांत ज्ञान कैंचें ? । करिसी भान सर्व जगाचें । म्हणूनि चिद्रूप तूंचि. ॥ १२ ॥ रमणीपुत्रादिक विषय । धनादि तुझ्याचि करितां प्रिय; । तुज तूं प्रिय हा निर्विषय, । म्हणूनि आनंदरूप. ॥ १३ ॥ बाह्यविषयादि खटपट । याचा काळें येतो वीट. । तुझी तुज प्रीति हे अवीट, । म्हणूनि आनद तूचि. ॥ १४ ॥ केवळ आनंदस्वरूप, । निद्रेमाजी तू अरूप, । स्पष्टचि वदसी मी सुखरूप । निजलों होतों निवांत. ॥ १५ ॥ जागृती आणि स्वप्नांतही । जे जे आनंद विषयेंद्रियीं, । ते ते तुझांचि लेशें

पाहीं । दिसती सर्वही सुखरूप. ॥ १६ ॥ म्हणसी जागरीं दुःखमान, । तो तर बुद्धिधर्म जाण. । बुद्धि निद्रेमाजी लीन । होतां दुःख तुज नसे. ॥ १७ ॥ ऐशीं तुझीं स्वरूपें तीन, । सच्चित्सुख हें एकचि जाण, । परस्परें नसती भिन्न; । तूंचि अभिन्न एकलें. ॥ १८ ॥ सत्ता केवळ ज्ञानरूप, । ज्ञानचि सत्ता हें स्वरूप, । आनंद तोहि तद्रूप, । सच्चिद्रूप जाण तूं. ॥ १९ ॥ सत्तेहूनि ज्ञान भिन्न । म्हणतां, सत्तेसि जडपण । ज्ञानीं नसतां सत्ता जाण । नश्वर ज्ञान होईल तें. ॥ २० ॥ तसेंचि सत्ताज्ञानाहून । सुखही म्हणतां जरि भिन्न । तरि मग दुःखचि सत्ताज्ञान । स्वरूप नश्वर ठरेल. ॥ २१ ॥ म्हणोनि सुखचि ज्ञानसत्ता, । सत्ताज्ञानचि सुखरूपता; । नसे परस्परें भिन्नता । सच्चित्सुखता एकचि तूं. ॥ २२ ॥ ऐसा त्रयरूपीं तूं एक, । अज्ञचि सच्चिद्घनसुख देख. । जग हें नामरूपात्मक । मिथ्या विवर्त जाणावा. ॥ २३ ॥ निद्रेमाजी हें जग नाहीं, । तूं तर साक्षी असती पाहीं. । म्हणोनि विवर्त तुझे ठायीं । जग हें रज्जुसर्पवत्. ॥ २४ ॥ बुद्धिद्वारा प्रपंचभान, । जागरस्वप्नीं हें निशान; । बुद्धि नसतां तूं निर्गुण, । निर्विकल्प निजज्ञान. ॥ २५ ॥ जैसा सुवास लोहचुंबक । चळवूनि अकर्ता तो देख, । तैसा आत्मा तूंचि एक । अकर्ता चळवूनि बुद्ध्यादि. ॥ २६ ॥ भ्रामक असे अचळ स्थिति. । आपाप सुया त्या चळती । केवळ सन्निधानप्राप्ती; । श्रम काय भ्रामका ! ॥ २७ ॥ तैसा तूंचि सच्चिद्घन, । अलिप्त, साक्षी, विलक्षण. । जड हे तुझ्या आश्रयेंकरून । वर्तती सर्वही देहादि. ॥ २८ ॥ बुद्धींद्रियेंचि नानापरी । वर्तती आपुलाल्या व्यापारीं; । तूं तर साक्षीभूत निर्धारीं । असती जैं रविरूप. ॥ २९ ॥ शरीरवाचामनेंकरून । जें जें निपजे पापपुण्य, । त्याचा साक्षी, अकर्ता भिन्न । भोक्ता तूं कूटस्थ. ॥ ३० ॥ जडवर्गाचें तुजला ज्ञान । म्हणोनि साक्षी हें अभिधान; । द्रव्यनिरासीं साक्षीपण । विरे तुझेंचि तुजमाजी. ॥ ३१ ॥ दृश्यापेक्षा हें द्रष्टृत्व, । साक्षीपेक्षा हें साक्षित्व, । दृश्य नसतां मग द्रष्टृत्व । नाम कैचें तुजलागीं ! ॥ ३२ ॥ दृश्य, द्रष्टा आणि दर्शन, । ध्येय, ध्याता, तिसरें ध्यान, । त्रिपुटीरहित तूं चिद्घन; । त्रिपुटी मिथ्या मायिक हे. ॥ ३३ ॥ माया दृश्यचि जेथें नाहीं, । कैचें साक्षी मग नामही ? । केवळ निर्विकल्प

अक्षयी । पूर्ण ब्रह्मचि तूं जाण. ॥ ३४ ॥ ज्ञानाज्ञानातीत ज्ञान, । जाणीवनेणीव रहित जाण; । स्वरूपज्ञप्तिमात्र चिद्‌न । भूमानंदचि केवळ तूं. ॥ ३५ ॥ ऐसें तुझें स्वरूप जाण । कथिलें, शिष्या, हें निर्गुण. । तदाकारें बुद्धि, मन । करूनि राहें सर्वदा. ॥ ३६ ॥ सदा एकांतीं रहिवास, । विषवत् विषयसुखाचा त्रास, । करूनि कामक्रोधनाश । स्वरूपीं वृत्ति स्थिर करीं. ॥ ३७ ॥ ज्या ज्या विषयीं मन हें धांवे, । त्या त्या साक्षित्वें निरसावें; । मग तें निर्वात स्थिरावें । अभ्यासाचें बळ होतां. ॥ ३८ ॥ टाकोनि दृश्याचें चिंतन, । स्वरूपीं स्थिर करोनि मन, । निर्वातींचा दीप जाण । तैसा निर्वात राहें तूं. ॥ ३९ ॥ उठोनि विरमे पूर्ववृत्ति, । जोंवरि अन्य न उठे चित्तीं । मध्यें निर्वात सहजस्थिति, । निर्विकल्प, शिष्या, तूं. ॥ ४० ॥ रात्रदिवस क्षणानें क्षण । करिजे वृत्तीरहित मन. । दृढतर स्वरूपीं निमग्न । निर्विकल्प असावें. ॥ ४१ ॥ अनंतब्रह्मांडांखाळती । अनंतब्रह्मांडांवरती । तूंच शिष्या ब्रह्ममूर्ति । व्यापक सर्वही दशदिशा. ॥ ४२ ॥ शिष्या निराकार तूं जाण । व्यापक भरलासि परिपूर्ण; । तुजवांचोनि रितें स्थान । नसे अणुमात्र जगीं. ॥ ४३ ॥ सागरीं जळ, गारेसीं जळ, । आंत बाहेर तें केवळ; । तैसें ब्रह्मचि तूं निर्मळ, । शिष्या, जगांतरीं पूर्ण. ॥ ४४ ॥ ऐसा वृत्तीचा अभ्यास । करितां नित्य हा निदिध्यास, । मन हें पावून ब्रह्मसुखास । होईल परमानंदरूप. ॥ ४५ ॥ परमात्मा तोच कळतां, । सर्वही देहाभिमान गळतां, । जिकडे जाईल मन तत्वतां । तिकडे समाधि अद्वैत. ॥ ४६ ॥ अखंड ब्रह्माकार मन । केवळ परमानंदघन; । करोनि स्वानंदीं निमग्न । निर्वात राहें निजरूपीं. ॥ ४७ ॥ मिथ्या औपाधिक संबंध; । जीवेश्वरांसि कैंचा भेद? । मी, तूं इत्यादि सवाद; । द्वैत कैंचें अद्वैतीं? ॥ ४८ ॥ मिथ्या बंध आणि मुक्ति । विद्या, अविद्या, माया, शक्ति; । अंतःकरणीं या वसती । सत्वासत्वेंकरून. ॥ ४९ ॥ अविद्यावृत्तीनें बंधत्व, । विद्यावृत्तीनें साक्षित्व, । शुद्धसत्वीं हें मुक्तत्व, । परि हें नसेचि निजरूपीं. ॥ ५० ॥ बंधमुक्तीसि कारण, । शिष्या, मनचि; तूं हें जाण. । विद्याविद्येचें उत्थान । काळें मनांत होतसे. ॥ ५१ ॥ विद्याअविद्यामायावृत्ती । एकचि द्रवरूपें भासती; । विवेक करितां निमोनि जाती । परमानंदस्वस्वरूपीं. ॥ ५२ ॥

भावित वृथा देहाभिमान । करोनि प्रारब्धा आधीन, । सांडोनि कुवासना, हें मन । परमानंदीं लावावें. ॥ ५३ ॥ पावेनी स्वानंद सुखास, । हरि-गुरुभजनीं उल्हास, । श्रवण, मनन, निदिध्यास । केला करिजे हाचि पुन्हा. ॥ ५४ ॥ सद्गुरुरघुनाथाचा दास । मौनी सांगतसे तुज खास, । टाकुनि देहबुद्धीचा ध्यास । स्वरूपीं राहें सुस्थिर. ॥ अरे, तू सच्चिदानंद-सांक्षी, । वस्तुत असाक्षी ॥ ५५ ॥ इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य-अद्वैतसच्चिदानंदेंद्रसरस्वतीश्रीरघुनाथाचार्यकिंकरमौनीविरचितो लघुबोधः

---

# ७. सौंदर्यलहरी.

( ललितानंद ).

नत्वा गुरुं गणपतिं, स्मृत्वांतस्त्रिपुरां परां
' सौंदर्यलहरी 'स्तोत्रव्याख्यां कुर्वे यथाधिया. १.

नमुनि सद्गुरु, देव गजानना, । हृदयिं चिंतुनियां नगजानना,
'लहरिसुंदर' नामक हे टिका । कठिन शंकरउक्ति, मऱ्हाटिका. २.

ज्याचा कीं डमरूनिनादजनितें व्याकर्णसूत्रें भलीं
शेषालागिं चतुदर्श प्रियकरें शंभूकृपे लाभलीं,
त्याचा जो अवतार, शंकर गुरु प्रख्यात भूमंडळीं
तद्वक्त्राब्जगिरा दुरतविदुषा तज्ज्ञान आखंडली. ३.

नाना शास्त्रकलाकलापकुशलां व्याकर्णनैय्यायिकां
दुर्गम्यार्थ रहस्य हें, स्फुट नसे वेदांतमीमांसकां,
ज्योति शास्त्रविदांसि लेश न कळे, कोण्हासही नाकळे,
हें तों आगमगुह्य बाळक म्हणे, मातें कसें पैं कळे ! ४.

' नाविष्णु पृथिवीपतिः ' शुभमती हे बोलती भारती,
ज्याची पुण्यगती अलौकिक रिती निख्यात या भारतीं,

श्रीमद्गायकवाडवंशवसती या गुर्जरीं शाश्वती
आज्ञा शक्तिमती ममकृति, फत्तेसिंहाख्यराजन्वती. ५.

आतां वदुनि संत, सज्जन, महा श्रोते, द्विजां, पंडितां,
प्रार्थी बाळक बोबडें शुभमती, वाणी नसो खंडिता,
व्हावें, हो, अमयाशिषा शुभमनें; संपूर्ण टीका घडे;
वाग्देवी वदनाबुजीं वसुनियां गूढार्थ हा सांपडे. ६.

गीर्वाणपदरचना सहजें निगूढा, । ते प्राकृतें समपदीं न घडेचि रूढा;
त्यामाजि शंकरगिरा गहना विशेषीं, । यालागिं दोष न दिजे पदअर्थशेषीं. ७.

---

शिवाला शक्त्यैक्यें सकळ विभुताशक्ति उघडे;
नसे शक्ती तेंव्हा किमपि करणें कार्य न घडे;
असी तू आराध्या विधिहरिहरेंद्रां भगवती;
प्रणम्या स्तोत्रा ते अकृतसुकृता कोठुनि गती? १.

तुझ्या पादाब्जांचा नमुनि लघु रेणू धरि विधी;
तयाचा सामर्थ्यें रचित भुवनें तो निरवधी;
हरी पाळी त्यातें दशशतशिरीं तो अहि धरी,
हरक्षोभावेशें भुवनमसितोद्धूलन करी. २.

अविद्याचा अंत करणतमसूर्योदय करी;
जडला चैतन्यीं प्रथितमकरंदस्तुतिझरी;
दरिद्राला चिंतामणिगुण; भवाब्धीं बुडतयां
वराहाची दंष्ट्रा मुरहरिणि उद्धारिणि तयां. ३.

विना तू सर्वांचा अभयवर हस्तीं विलसती;
न होसी तू तैसी अभयवरहस्ती भगवती.
भयातें टाळाया, अभिलषित वाञ्छाधिकफळा,
शरण्ये, लोकातें तव चरणि हे अद्भुत कळा. ४.

तुला ध्यातां विष्णु, प्रणतजनसौभाग्यजननी,
स्वयें नारी जाला, सुमुखि, शिवचित्तासि हरनी.

तसा वंदी मार्ते मदन अतनुत्वें तव पदा,
मुनींचां हृत्पद्मीं रिघुनि करि मोहाकुळ तदा. ५.
धनू तें पुष्पांचें, भ्रमर सित, पंचेषु विलसे,
वसंतें सामंतें, मलयपवनाचा रथ दिसे;
तथापि, श्रीमाता, अनुपमकृपापांग मदना
तुझा जाला, तेणें त्रिभुवनजयी; सौख्यसदना. ६.
रणत्कारे कांची, करिणिशिशुकुंभ स्तनतटी,
कटी सिंहा ऐसी, शशिमुखि, शरच्चंद्र मुगुटीं;
धनुर्बाणें, पाशांकुश धरुनि हस्ताब्जनिकरीं
पुढें राहो माझ्या, त्रिपुरहरपुसी शुभकरी. ७.
सुधासिंधूमध्यें सुरतरुवनीं वेष्टित मही
मणिद्वीपीं शोभा उपनिपिनि चिंतामणिगृहीं
शिवाकारीं मंचीं परशिवपलंगीं, सुखकरी,
तुला धन्य ध्याती, अनुपमचिदानंदलहरी ! ८.
मही मूळाधारीं, उदक मणिपूरीं, हुतवहें
स्थिति स्वाधिष्ठानीं, हृदिं पवन, आकाश वरि हें;
मना भ्रूमध्यस्था, कमळपथ भेदूनि असती,
सहस्रारांभोजीं विजनि पतिसंगें विहरसी. ९.
सुधाधारासारें चरणकमलांतर्निगळितें
शिरीरा सिंचोनी, उतरसि पुन्हा षट्कमळ तें.
स्वभूमीतें येसी भुजगतनुसाम्यें त्रिवलयें
स्वरूपें तं निद्रा करिसि कुलकुंडीं, जननिये. १०
शिवा ऊर्ध्वं चारी, शिवयुवति पंचाध, विमळे,
प्रभिन्ने शंभूचीं नवप्रकृतिमूळात्मकदळे,
त्रिचत्वारिंशाले वसुदळ पुढें तद्दिगुणितें
त्रिवृत्तें भूगेहत्रयनवहिर्भूर्णा चरण ते. ११.

तुझ्या सौंदर्याची, जननि, उपमा या त्रिभुवनीं
कवींद्रां ब्रह्मेंद्रां अवचनिय, पैं कल्पित मनीं.
पहाया सोत्कंठा सुरवधु मनीं इच्छिति, भवीं
तपाला दुःप्राप्या असासि, शिवसायुज्यपदवी. १२.

नराला वृद्धत्वें नयनिं न दिसे, इंद्रिय जडें.
, कृपापांगीं, अंबे, अवचट तुझ्या तो जरि पडे,
स्मराभासें त्याला युवति शत धांवोनि धरिती,
सुटे वेणी, नम्र, प्रकट कुचकांचीहि गळती. १३.

धरे पट्पंचाशत्, द्वय अधिक पन्नास उदकीं,
द्विषष्टी अग्नीचे, पवनकर चौपन्न वरि कीं,
नभीं छत्तीसद्दे, भृकुटिगत चौसष्ट वरवे
मयूख; श्री, त्याचे उपरि तव पादाब्ज मिरवे. १४.

शरच्चंद्राभासा, हिमकरजटाजूटनिकरा,
वराभीती चिन्हें, स्फटिकगुटिकापुस्तकधरा,
अशा ध्यानें कोण्ही, जननि, तुज येकेहि दिवसीं
न वंदी; त्यालागीं मधुर कविता होइल कसी ? १५.

कवींद्राचे चित्तीं, कमळवनिं बालार्कसदृशा,
तुजे ध्याती कोण्ही अरुणकिरणा रम्य सुदृशा,
तयाला वाग्देवीचपळतरशृंगारलहरी
मुखाब्जीं सत्काव्यें प्रकटति बुधां रंजनकरीं. १६.

जनित्र्या वाणीचां शशिमणिशरच्चंद्रविमळा,
वशिन्याद्या शक्तीसह, जननि, जो ध्यात तुजला,
करी सत्काव्यें तो मधुमधुर पद्यें नवरसें,
प्रसादें वाग्देवीवदनकमलामोदसुरसें, १७.

तुझी देहच्छाया तरुणरविसाहस्रकिरणा
मही आकाशांतीं खचित निरखी जो द्युतिगुणा,
स्त्रिया वश्या त्याला बहु हरिणसंत्रस्तनयना,
सहोर्वश्या वश्या, किति किति न गीर्वाणललना ? १८.

मुखाकारीं बिंदू, करुनि कुच ते बिंदुयुगळा,
हकारार्धे ध्याती, भगवति, तुझी मन्मथकळा,
त्वरेनें समोहें युवति वश त्यालागीं सुभगा;
त्रिलोकीलाही तो भ्रमवि रविचन्द्रस्तनयुगा. १९.

झरे अंगांगींचे स्रवति किरणें अमृतरसें;
तुला ध्यातां चित्तीं, हिमकरशिळाकांतिसदृशे,
क्षणें तो सर्पाचें विष उतरि, जैसा गरुड कीं;
ज्वरार्ताला दृष्टी सुखकरि सुधाधारच निकी. २०.

जशी विद्युल्लेखा रविशशिशिखीं साम्य विलसे,
षडाधाराहूनी दशशतदळीं जाऊनि वसे;
कळा ते कामाख्या बहुलतर तेजात्मक मुनी
पहाति स्वानंदें स्वमतिपरमाल्हादजननी. २१.

'भवानी! दासातें वितर, करुणे, त्वत्पद मला,'
असी वांछा स्तोत्रीं धरुनि हृदयीं ध्यात तुजला;
तयाला तें देसी निजपद, भवानीत्व सदया,
मुकुंदब्रह्मेंद्रास्फुटमुकुटि आरार्तिक जया. २२.

शिवाच्या वामांगा हरुनि हृदयीं तृप्ति न दिसे,
दुजा अर्धांगाचें परिहरण इच्छा मनिं वसे;
तथा, श्री, त्वद्रूपी प्रकटअरुणाभा त्रिनयना,
स्तनाढ्ये आनम्रा शशिशकलउत्तंसितघना. २३

स्रजी ब्रह्मा, पाळी हरि, सकळ रुद्र क्षय करी,
तिरस्कारें त्यांचे स्वतनु लपवी ईश्वर वरी;
गुणातीतें तेव्हां गुणजनन पैं रक्षुनि शिवें,
सव भ्रभंगीं विलसत यथापूर्वचि नवें. २४.

तुझे पादांभोजीं विधिविहित जी पूजन करी,
तिन्ही देवां पूजा सहज घडली वास्तव वरी;
सदा ते त्वत्पादोद्वहनमणिपीठोऽग्रलतटीं
रहाती सान्निध्यें नतमुकुटबद्धांजलिपुटीं. २५.

विधी पावे मृत्यू, मधुरिपु विरामासि, पुढती
विनाशातें पावे यम, धनपती आणि निर्ऋती.
स्वनेत्रा माहेंद्री उघडुनि पुनर्मीलन करी,
महासंहारीं या तव पति लसे ब्रह्मशिखरीं. २६.

मुखें बोलूं तो तो जप; नियममुद्रा करचळें;
प्रदक्षीणा भूमिक्रमण, हवनीं भोजन बळे;
निजा ते साष्टांगप्रणति तुज आत्मार्पणमती;
पुजेचे पर्यायप्रकर सहजें हे विलसती. २७.

यथेच्छा श्री दीनाप्रति अनुदिनीं जीं वितरिती,
सुगंधें, सौंदर्यें कुसुमनिकरां तुच्छ करिती,
असीं पादांभोजें, सुरतरुसमूहात्मसुखदें,
बुडो तेथें जीवभ्रमर मम षष्टेंद्रियपदें. २८.

जरामृत्युत्रासें सुरवर सुधापान करिती,
तथापी पीयूश पिउनि विधिइंद्रादि मरती,
विष क्रूर ग्रासी शिव परम हाळाहळसिमा
न सामर्थ्यें त्याचे; जननि, तव सौभाग्यमहिमा. २९.

किरीट ब्रह्याचा चुकवुनि पुढें विष्णुमुगुटा
कठोरा उल्लंघीं, अडखळसि देवेंद्रमुगुटा;
प्रणामातें घ्यावें शिव निकट आले " झडकरी
चलावें सामोरां " वदति वचनें सेवक वरीं. ३०.

सुतंत्रीं चौसष्टीं रचुनि भुवनीं सिद्धि सकळा,
न येकेकें सिद्धी म्हणवुनि हटें शंभु उगला;
पुन्हा त्वत्प्रीतीनें सकळपुरुषार्थप्रद जनां
स्वतंत्र, श्री, तूझें क्षिति अवतरे सिद्धिघटना. ३१.

हकाराद्या विद्या परम अनवद्या त्रिजगतीं,
'शिवः शक्तिः कामः क्षिति' म्हणुनि मंत्राक्षरगती;
त्रिकूटांतीं, माये, सकळजगदुत्पत्ति मिरवे,
तियेतें हृल्लेखा भजति तव देहाकृति, शिवे. ३२.

त्रिबीजें कामादि प्रथम, पुढती पञ्चदशिका,
महामंत्रें ध्याती निरवधि महाभोगरसिका,
जपी माळा चिंतामणिरचित आक्षात जनितें,
शिवाग्नीचे ठायीं हवन करिती गोघृतशतें. ३३.

स्वदेहें तू शंभू, रविशशिकुचाल्कृतवती,
तशा साभिप्रायें शिव वदत मी शक्ति निगुती.
पवित्रे, तू तस्मात्परशिवपराशक्ति असती,
महायोगानंदें उभयतनुसाम्यें विलससी. ३४.

मनाकाश स्वार्गे असति पवनाग्नीजलमही,
तुझ्या ठायीं याचा उघड परिणाम, क्रमणही,
स्वकीया रूपाचें सदन परिणाम स्थिरचरीं,
चिदानंदाकारें धरीसि, शिवकांते, शुभकरी. ३५.

तुझ्या आज्ञाचक्रीं रविशशिप्रभाही, शशि(मु)खी,
शिवा वदू तेथें तुजसहित, मदस्मितमुखी
असें ध्याता भक्ती रविशशिहुताशात्मविमळा,
निरालोक्या लोकां असति भुवनीं तैजसकळा ३६.

विशुद्धी त्वच्चक्रीं स्फटिकसदृशा व्योमजनका
नमू शंभू तेथें तव सह समानव्यसनिका.
शशीतुल्या रश्मीं उभयतनुसमानित जनीं
निधूतांतर्मोहा समुदितचकोरीव भुवनीं. ३७.

प्रबोधाचें पकेरुह हृदयिं सौरम्य विलसे,
भजों हंसद्वंद्वें मिथुन मुनिहृद्गोचर असे,
जयालापें अष्टादशगुणितविद्यावितरणी
गुणप्राप्ती दोषां त्यजुनि जळ घे दुग्ध वरुनी. ३८.

स्फुरे नानारत्नाभरणिं धनु माहेंद्रचि जसें,
जयाचे शक्तीनें द्रुत हरति मोहाधतमसें,
दशार्णाब्जस्था त्या नमुनि जळदश्यामतनुला,
सुधा सिंची जो कीं जन सकळ काळाग्नि पडिला. ३९.

तुझे स्वाधिष्ठानीं शुचि कमळिं संवर्त विलसे;
तया संवर्तातें स्तवुं सुसमया भक्तिसुरसें;
जयाचे क्रोधाग्नी सकळ भुवनें शीघ्र जळती,
दयार्द्री दृष्टीनें निवविसि जनां, शीतळवती. ४०.

तवाधारीं शंभू तुजसहित लास्यार्थ विनटे,
नमूं त्याला प्रीती, नवरसमहातांडवनटे.
उभाभ्यामेताभ्यामुभयविधिमुद्दिश्य दयया
सनाथाभ्यां जज्ञे जनकजननीमज्जगदिदम्. ४१.

किरीटीं माणिक्योज्वळ तपन बारा झळकती,
जयाचे छायेचा स्फुट शशिकळा पैं मिरवती.
स्तवी जो तद्ध्यानें उदित भुवनीं कौतुक जनां,
सुरेंद्राचें कीं हें धनु म्हणति सबद्धधिषणा. ४२.

हरू माझ्या मोहा लघु तुळुनि इंदीवरवना,
सुगंधें सुस्निग्धें तव कबरिभारो अति घना;
सुगंधप्राप्तीला सहज सुरवृक्षादिकुसुमें
स्वयें येती स्पर्शास्तव कबरिभारीं तव, उमे. ४३.

करू मत्कल्याणा मुखकमळसौंदर्यलहरी,
प्रवाह स्रोताचा सम सरळ सीमंतशिखरीं.
स्फुरे जो सिंदूर प्रबळकबरीभारतिमिरीं
जसे बालार्काचे किरण निगडीबद्ध चिकुरीं. ४४.

स्वभावें जी वक्रा, भ्रमरसम केशावळि दिसे,
रुळे वक्त्रांभोजीं, ललित तव वक्त्रेंदु विलसे.
हँसे अन्योन्यातें रदजनितकिंजल्कसमता
सुगंधें त्या मत्तभ्रमर शिवचक्षू निजहिता ४५.

ललाटीं लावण्य स्फुरत सम चन्द्रार्ध भुवनीं,
दुजा तो अर्धेंदू, उभय उफराटें मिळवुनी,
सुधालेपें खंडद्वय करुनि एकत्र जडला,
जसा दैदीप्यश्री सकळ शशि राके उगवला. ४६.

भ्रूवामर्गे भगे गुनन्मय तें भूसरधनू,
चिला तो नेत्राचा भ्रमरकुलपक्तीसम तनू.
करें दक्षेंहूनी इतर करि ध्याया धरि मनीं,
न लाहे मध्यांत स्मसुपिस प्रकोष्टीं कवळुनी. ४७.

दिनाचा कर्ता तो दिनकर तुझा नेत्र उजवा,
निशी डाव्या नेत्रीं समुदय करी चन्द्र बरवा,
तृतीया दृष्टीनें लघु करुनि हेमाबुजरुची
धरी सध्याकाळीं दिवसनिशिसधी शुभ शुची. ४८.

विशाळा, कल्याणी, विलसति अयोध्याकुवलया,
कृपाधारा धारा नगरि, मथुरा भोगनिलया,
अवती मध्यस्था बहुनगरि निस्तारजयनी
तुझी त्या त्या नामीं विहरत असे कीर्ति, जननी. ४९.

कवींचा सदर्भ स्फुट सुमनगुच्छद्वय वरे,
कटाक्षें कर्णांतीं भ्रमरतनुवद्भासति खरें;
न सोडी त्वद्दृष्टी नव नव रसां लुब्ध म्हणुनीं,
वृथा ईर्षा वाहे शिव नयन आरक्त करुनी. ५०

शिवाला शृंगारें मुदित, इतरा क्रूरवदना,
सरोषा गंगेसीं, शिवचरितआश्चर्यरचना;
विहाली सर्पाला कमळवनशोभाविजयिनी;
सहासा दृष्टीतें सखिजनिं दयार्द्रैकनयनीं. ५१.

कटाक्षें कर्णांताक्रम गरुडपक्षद्युतिगुणें
शिवाचा चित्तेच्या चळण करिती चचळपणें.
लसन्नेत्रोपांतें हिमगिरिकुलोत्तसकलिके,
तुझ्या कर्णाकृष्टें स्मरशरविलासा करि निकें. ५२.

त्रिवर्णांतें केलें त्रिनयन(सु)नीलांजनकळे,
द्विजादी हे जाती, गिरिशरमणी, चित्तविमळे,
त्रिदेवा कल्पांतीं पुनरपि समुत्पन्न करिसी,
रज.सत्वोत्पत्ती तमगुणविहारस्थिति तसी. ५३.

कराया पुण्यात्मा मज, शिवपराधीनमनसे,
त्रिनेत्रीं सत्कांती अरुण, धवल, श्याम विलसे.
नदस्वामी शोणाधिप, सुरधुनी, सूर्यतनया
त्रितीर्थीचीं स्नानें करविसि परब्रह्मनिलया. ५४.

तुझ्या कानीं चाडी नयन करिती मीनविकृती,
भयें त्या मासोळ्या निशिदिनिं जळामाजि बुडती.
दिनांतीं वद्द श्री स्वदशपुटकीं नीळ कमळें
उषःकाळीं सोडी प्रविशति पुन्हा शर्वरिवळें. ५५.

निमेषोन्मेषानें प्रळयउदय, श्री, त्रिभुवना,
असें कोण्ही साधू वदति, गिरिजे, सत्यवचना.
निमेषें पैं होतो सकलभुवनध्वंस सहजें
म्हणोनी त्या रक्षा करिसि अनिमेषेंचि, गिरिजे. ५६.

सुदीर्घा दृष्टीनें लघु करुनि नीलांबुजछवी,
दयार्द्रे, त्या दृष्टी झडकरि दयार्तासि निववीं.
तयानें मी धन्य क्षिति; वरि नये हानि तुजला;
वनीं, गेहीं जैसा हिमकिरण साम्यें उगवला. ५७.

सुरम्यें कर्णाग्रें, गिरिवरसुते, वक्र दिसती,
धनुष्यें कामाचीं, कवतुक न कोण्हासि करिती ?
दृशापांगें सांग श्रवणपथ उल्लंघित असे;
शिवाचा लक्षातें कुसुमशरसंधान विलसे. ५८.

प्रभा गल्लीं तेथें प्रतिफळित तांटकयुगळें,
चतुश्चक्रीं वक्रीं मदनरथ मानूं मतिबळें;
शिवे, चक्रें दोन्ही रविशशि, महीचा रथ लसे,
महायोद्धा मार प्रमथपतिसीं स्पर्धत असे. ५९.

महावाग्देवींचा सुरसरससूक्तें नवरसां
करीसि पानातें श्रवणचषकीं स्वादु सुरसा.
चमत्कारश्लाघ्यें धुनित शिरसा कुंडलगणीं
झणत्कारें तारें प्रतिवचन आश्चर्य करणी. ६०.

तुझा नासावंश, ध्वज हिमगिरीचा सबळ कीं,
फळप्राती आम्हां अभिलषित योग्या करु निकी.
जयाश्वासें मुक्तामणि शिशिरतेनें निपजती,
बहिर्वृद्धि श्रीनें तव अधारें मुक्तामणि, सती. ६१.

स्वभावें आरक्ता, जननि, तव दंताळि विलसे,
वदावें साम्यत्वा तरि लघुगुणी विद्रुम दिसे;
लसद्वालार्काची द्युति, अरुणिमा कोठुनि तया ?
नसे लज्जा कोण्हा अधरिं तुळितां विद्रुम जया ? ६२.

स्मितास्यें चंद्राभें लसितमुखज्योत्स्नामृत पितां
चकोरांला जाली अतिमधुरते चंचुजडता;
म्हणौनि चंद्राचे अमृतकिरणां आम्लरुचिनें
पिती स्वच्छंदें ते निशिसमयीं काजीकमतिनें. ६३.

श्रमार्तो, तूं माता, पतिगुणकथा नित्य कथितां,
जपापुष्पा ऐशी, जननि, तव जिव्हा निरखितां
जिये अग्रीं वाणी स्फटिकसदृशा बैसुनि वरी
तनू माणिक्याची स्फुरत परिणामीं द्युति धरी. ६४.

रणीं दैत्यां सर्वां जिणुनि त्यजिती टोपकवचें,
श्रमार्तो, सूर्यास्त्रीं त्रिपुरहरनिर्माल्य न रुचे;
विधींद्रोपेंद्रादी हळुचि शशिकर्पूरधवळें,
प्रसादातें घेती, जननि, तव तांबूलशकलें. ६५.

स्ववीणा वाग्देवी धरुनि शिवमाहात्म्य कथितां,
महागानारंभीं, जननि, तव वक्त्रांबुजगता
निघे वाणी सप्तस्वरमधुर, तें लज्जितमती
स्वयें वीणा झांकी निजवसनिं वाणी भगवती. ६६.

भुजाश्लेषीं ग्रीवा तव, गिरिसुते, कंटकवती
शिराळागीं भासे मुखकमळनालाकृतिमती.
स्वयें गौरा काळागरुबहलपंकानुकलिका
मृणालाली जैसी विलसत गळां हारलतिका. ६७.

त्रिरेखा कंठीचा, मधुरतरगानैकनिपुणे,
विवाहीं श्रीशंसुग्रथितकरबंधत्रयगुणें,
प्रबंधें सद्गीतें उठति शुभ सत्त स्वर, उमे,
त्रयग्रामें सप्तस्थितिउदितमूर्च्छा अनुगमें. ६८.

मृणाली कंजाची, मृदुतर तशा श्रीभुजलता;
तिन्ही, चाऱ्ही वक्त्रीं स्तवि विधि शिरच्छेद घडतां,
नखें रुद्र छेदी प्रथम शिर, तें येकचि शिरीं
करें रक्षा केली, चहूं शिरिंहि तैसे कर धरी. ६९.

नखज्योत्स्नाकंजा लघुतर गणी हास्य करुनी,
कराब्जाची शोभा; स्तवन करुं कैसी स्ववदनीं ?
कदाचित् येकांशें कमाळिं उपमा, तेहि निकळा,
परि क्रीडे लक्ष्मीचरणतळलाक्षारुण दळां. ७०.

पिती येके काळीं स्तन गणपति, स्कंद बरवे,
हरू तें मत्खेदा स्रवत मुखिं जें दुग्ध मिरवे.
पहातां जो शंके गजमुख उरीं कुंभरचना,
स्वकुंभस्पर्शानें करि जननिला हास्यवदना. ७१.

तुझे वक्षोज, श्री, अमृतरसमाणिक्यघट ते,
मनीं माझ्या भ्रांती किमपि न वसे, हो गिरिसुते;
म्हणोनि तत्पाना करिति वधुसंसर्ग त्यजुनी
कुमारत्वें अद्यावधि गणपति, स्कंद, जननी. ७२.

गजाचे कुंभांतर्गतजनित मुक्ताफळमणी,
समारंभें हारावलिग्रथित सूत्रें शुभगुणी,
कुचीं शोभे त्यांची द्युति, अधरबिंबीं प्रसरली,
जसी शंभोकीर्ती त्रिपुरजयें चित्रा मिरवली. ७३.

तुझ्या स्तन्यें, धन्ये, हृदयिंहुनि दुग्धांबुधि, शिवे,
वहातो त्या पोटीं अमृतरस वाग्देवि मिरवे;
कृपेनें तत्पान द्रविडशिशुलागीं करविसी,
कविप्रौढांमध्यें नवरसिक काव्यें वितरिसी. ७४.



हरक्रोधज्वाळाज्वळित मदनें त्रास धरुनी
सरा नाभीमध्यें पतन करि दाहार्तिशमनीं,
उठे त्या धूमाची सरळ लतिका तेथुनि, शिवे,
तियेतें रोमाली जन वदति जाणोनि बरवें. ७५.

जशी कालिंदीची कृशततरतरंगाकृति दिसे,
अनोपम्या, अंबे, तव कुचतटीमध्य विलसे.
सुघर्षे अन्योन्यें कुचकलशिंची अंतरचरीं
तनू आकाशाची प्रविशत दिसे नाभिकुहरीं. ७६.

स्फुरे वल्ली रोमावलि, तवं कुचारंभक फळें,
अळें कामाग्नीचें, सुरतदिनिशानर्त, त्रिमळे,
रतीचा लीलेचें सदन अथवा नाभि, गिरिजे,
शिवाचें सिद्धीचें विवर नयनानंद सहजें. ७७.

स्वभावें जे सूक्ष्मा स्तनतटभराक्रांत नमली,
. म्हणोनी नाभीचा त्रिवळि उदरामाजि शिरली.
सखे, ऐसें भासे तटिनितट तेथें तरु जसा,
चिरस्थायी तैसी कटि कुशल राहो, ध्रुव तसा ७८.

स्तनाचा घर्मानें तटवटित चोळीहि तुटते,
तथा बाहूघर्षे ललित करिती हेमघट ते,
तयाला रक्षाया कटिभवनकार्यी समजुनी
स्मरें केले बंध त्रिवळिलतिका रज्जु म्हणुनी. ७९.

नितंबस्थूलत्वें, गिरिवरसुते, झांकिसि धरा,
महिचा विस्तारा लघु करुनि हा निश्चय खरा.
नितंबीं यासाठीं सकळ भुवनीं साम्य गुरुता,
तयाचा प्राग्देशीं उपविशि लघुत्वा स्खलविता. ८०.

गजाची शुंडा, कीं कनककदळी, दोन उपमा
स्फुरे जंघायुग्मीं परि उभयही तुच्छमहिमा.
सतीधर्मे शंभुप्रणति करितीं वृत्त, कठिणें
फळें आलीं जानू विबुधकरिकुंभद्वयगुणें. ८१.

मृडाला जिंकाया द्विगुण शर केले, गिरिसुते,
तुझ्या दों जंघांचे तरकसभरी काम पुरते.
जया अग्रीं शोभा दशहि शर पादांगुलिपणें,
नखाग्रें तीं भल्ल सुरमुकुटसंघर्षितगुणें. ८१.

सदा वाहे ज्यांतें निगम शिरसा भूषणविधी,
तुझीं तीं पादाब्जें मम शिरिं समर्पी, सदयधी.
जया अर्घ्ये गंगा पशुपतिजटाजूट विलसे,
किरीटीं विष्णूचा द्युति अरुणरत्नांकित दिसे. ८३.

'नमो' बोलों वाचे नयनसुखकारी पदयुगा
तुझ्या, लक्षारंगें अनवरतरंगीत सुभगा;
अशोका वृक्षांचें वनहनन इच्छी शिव मनीं
अती ईर्षावेशें मृदुपण गुणेच्छा म्हणवुनी. ८४.

विनोदें सापत्नी स्मरत शिवतो क्रोध तुजला,
नमी तेव्हां भाळीं चरणयुगळें ताडिती भला,
स्मरोनि पूर्वीचे निजदहनवैरासि वरवें
तुळाकोटिकाणें स्मरकिलकिलीनूपुररवें. ८५.

हिवामध्यें जातां हिमगिरिगुहाक्रांत विमळा
निशी निद्राभागीं उपसि अपराण्हीं समकळा;
लघू कंजें लक्ष्मी पदकमळि भक्तासि विलसे,
पदाब्जें अंबेचीं हँसति कमळां, चित्र न दिसे. ८६.

विपत्तीतें नाशी पदकमळकांती तव भली,
कवींद्रीं ते कैसी कठिणकमठीपृष्ठ तुळिली ?
मुदा रुद्रानें जे कर धरुनि लग्नीं मिरविली,
महापाषाणीं ते, सदयहृदये, कां ग्लपविलीं ? ८७.

स्त्रिया स्वर्लोकींच्या, करनखशशी लाजवि तयां,
तुझीं श्रीपादाब्जें हँसति सुरवृक्षां गुणधियां;
फळें त्यांचीं इच्छासमचि, पदकंजीं बहुफळें;
दरिद्राला भद्रार्पण करिती लक्ष्मी निजबळें. ८८.

नदे कोण्हे काळीं, जननि, पद प्रक्षाळुनि तुझें,
निमिश्रें आलक्तें निमळ जळ विद्यार्थि सहजें
पिता तो वाग्देवीमुखकमळताबूलरस कीं
करी काव्यें मूका नवरसपदप्रासयमकीं. ८९.

गती पादाब्जांची अभिनव सिकाया परिचया,
अहो, हंसीं केलें तव सदनिं वास्तव्य मुधिया.
न सोडी पादाब्जें रणतमणिमजीरनिकरें,
वरी शिक्षा घत्ती स रि ग म न सत्तस्वरभरें. ९०,

विधी, विष्णू, रुद्रेश्वर तव पलगाकृति धरी,
शिव स्वच्छच्छायाकपटपटें आच्छादन करी,
तुझ्या कांतीमिश्रें शिव अरुण भासे कवतुका,
निनिर्मीसी नेत्रा बहुलरसशृंगाररसिका. ९१.

स्वकेशीं वक्रत्वें, ललितरदनें, मदहसितें,
मृदुत्वें गात्रांशें, कठिणकुचपाषाणभरितें.
कटि क्षीणा, जघा विपुल जघना, सर्व सुगुणा,
जगद्रक्षा शंभी जयति करुणातर्क्यशरणा. ९२.

वळकी कस्तूरी, रजनिपति बिंबात्मकजळें,
कळाचा कर्पूरें मरकतमणीपात्र घडिलें.
सुपात्रीं त्वत्पाना प्रतिदिनिं नभीं रिक्तबहरी
विधी वारंवारें सितअसितपक्षीं जळ भरी. ९३.

शिवाची तू राणी, म्हणुनि तुझिया दिव्य चरणीं
पुजेची मर्यादा चपळहृदया दुर्लभपणीं.
तथा ते ब्रह्मेंद्रादिकसुरवरांलागिं अतुळा,
तव द्वारीं सिद्धी नटति अणिमाद्याहि सकळा. ९४

पदांभोजीं आला मणिमुकुरतेजीं दिनमणी,
भयें नद्धकाब्जीं रितमित कर केले मृदुगुणीं.
यथा वक्रांभोजीं प्रतिफळित आदर्श उदरीं
निरातका होसी शशि निजहृदंभोरुहपरी. ९५

विधिकांता ध्यातां बहुत असती सत्कवि जनीं,
    धनाढ्यत्वें आम्हीं म्हणविति असों श्रीश भुवनीं.
विना शंभू, अंबा, सति, तव कुचालिंगन करी,
    असा कोण्ही नाहीं, कुरबकहि जें स्पर्श न करी. ९६.

तुझ्या अष्टी सिद्धी घृणिहि अणिमाद्या समुदिता
    तदैक्यें जो चिंती त्वमहमिति मातानुभवता,
त्रिलोकींचां सिद्धी तृण सम तया; चित्र न कधीं,
    महासंवर्ताग्नी मुकुटिं करि नीराजनविधी. ९७.

विधींची वाग्देवी गृहिणि वदती आगम मती,
    हरीकांता लक्ष्मी, हररमणि हे पार्वति सती,
तुरीया तूं कोण्ही अकळ मुनिदुर्गम्यकलना,
    महामाये, विश्व भ्रमविसि परब्रह्मललना. ९८.

स्तनें पीनोत्तुंगें हसितवदनां(भो)जरसिकें
    कटाक्षें कंदर्पाकृतिशतसहस्रद्युतिनिकें
हरालागीं भ्रांती हृदयिं पडते, हे तनु, उमा,
    तवाकारें भक्तां परिणति असी ध्यानमहिमा. ९९.

महावाणीलक्ष्मीपति विधिहरि श्रेष्ठ जगतीं
    रतीपातिव्रत्या मदनसमरूपें ढळविती,
सुटे अष्टौ पाशीं, अनुभवि परब्रह्म सहजें,
    चिरंजीवी तो कीं, जननि, तुजला जो नर भजे. ००.

निधे, संवित्स्मेरे, अगणितगुणे, नीतिनिपुणे,
    निराकारज्ञाने, यमनियमचित्तान्वितगुणे,
मिथीलिप्यूह्यीते श्रुतिउपनिषत्संस्तुतपदे,
    निरातंके, अंगीकृत करिं जगीं मत्कृति मुदे. १०१.

ज्वलज्ज्वालादीपीं दिनपतिसि नीराजन जसें,
सुधास्रावी चंद्रोपळजळलवें अर्घ्यहि तसें;
स्वनीरें अब्धीचा उदधिसि किजे तर्पण जनीं,
तुझ्या, वाग्देवी, तूं स्तुति करविसी तेंवि, जननी. १०२.

---

मंजीरध्वनिभूषणी, शुभमणीसद्रत्नहारोत्कटी,
स्फूर्जत्सिंहकटी, घनस्तनतटी, सत्कंचुकीगोमटी,
नीलेंदीवरकांति, मीननयना, श्रीमद्गिरींद्रात्मजा,
शंभुज्ञानकळा, विलासकुशळा, कैवल्यलक्ष्मीध्वजा. १.

श्रीदत्ताख्य परंपरा गुरुकुळीं आनंदनाथावळी,
नित्यानंदपदानुरक्त विमळानंदाख्य या भूतळीं
तत्पादाब्जषडंघ्रिचित्त ललितानंदाननें सुंदरी
बोले प्राकृत हे टिका स्विकरणें राहूनि हृत्कंदरीं. २.

वाग्देवी ममहृत्सरोजनिहिता बोधी, अरे बाळका,
मद्दासा, भ्रमसी वृथा भववनीं, ना जाणसी काळ कां!
नाशी जन्म, जरा, त्रिताप समुळीं श्रीमत् शिवा सुंदरी.
तत्पादाब्जामिलिंदचित्त करणें मांगल्य अत्यादरीं. ३.

श्रीशंकराचार्यवाणी मणीमंदिरीं
संस्थिता श्रीराजराजेश्वरी सुंदरी
तत्पादांभोज पुष्पांजळी अर्पणीं
श्रीविवर्ति हो अर्पितां स्त्रग्विणी. ४.

कवी गौरीकांतें विवरणसमीचीनरचना
पदव्यक्ती केली कविबुधवरप्राह्यरचना.
महाराष्ट्री भाषा उघड हृतभूषा वधु जसी,
परी तात्पर्यार्थे अधिक पुरुषां योग्यचि तसी. ५.

जसीं गोधूमान्नें रुचिर हरिणाक्षी, सुगरणी
करीती स्वादार्थे विविधअभिधें आकृतिगुणीं,
परीक्षा शब्दार्थे बुधवर सती जाणुनि मनीं
रुचे तें तें अंगीकृति करिति साष्टांग नमनीं. ६.

अहो मार्गी कांटे अवचट निमित्तेंचि पडती,
कृपाळू ते साधूजन उपकृती दूर करिती.
तसे दोषारोपें प्रतिजनक जे कंटक पदीं
तरी ते काढावे विमळपथिं सौंदर्यसपदीं. ७.

इति श्रीमत्सकलाम्नायदीक्षाशिक्षाविचक्षणविद्वद्वृंदविनुतचरणानिरामांतामृताब्धिनंदिनीनिवृत्तिलक्ष्मलक्ष्यालिंगितविग्रहश्रीमन्नित्यानंदशिष्यश्रीविठ्ठलानंदचरणारविंदमिलिंदीकृतमानसललितानंदविरचिता श्रीसौंदर्यलहर्या विवृत्तिः समाप्तिमगमत्।

---

# सद्वृत्तमुक्तावली.

## ( निरंजन माधव ).

श्रीमद्दंतिमुखासि वंदन करूं सप्रेम चित्तें सदा,
ब्रह्मेशानसुरेंद्रमुख्य जपती सर्वार्थसिद्धिप्रदा.
जो भक्ताभयदानशौंड विलसे, विघ्नाद्रि भंगी पवी,
विद्यापद्मविकास पूर्ण करितां ख्याती करी चिद्रवी. १.

देवी ब्रम्हकुमारिका, भगवती, वाणी, महारूपिणी,
निर्थी विश्वपणें भरोनि नटली विश्वाद्य नारायणी,
हंसारूढ, सुधांशुसुंदरमुखी, शुक्लांबरालंकृता,
वीणापुस्तकधारिणी, सुखमयी स्त्या वंदिली सर्वता. २.

ज्यातें सद्गुरुनाथनेत्रकमळा, चिद्भानु हा शोभला,
ज्याचा रश्मिकृपावळें तम हरे, वस्तू दिसे सोज्वळा;
तो अंत करणीं वसौनि वदवी हे सर्व शब्दावळी,
यासाठीं प्रगटे निरंजनमुखें सद्वृत्तमुक्तावली. ३.

.... ...... .. ................ ..... . .. .....
केला हा उपकार, सर्वेहि जगा दावोनि छंदावळी.
वेदच्छंद समूळ मूळ सकळा मंत्रासि जे बोलिले,
गायत्र्युष्णिगनुष्टुबादि बहुधा सूत्रक्रमें दाविले. ४.

झाले वैदिक लौकिकात्मक असे ते छंद सर्वांदिसे.
वेदीं वैदिक मंत्र मूळ सकळा मंत्रासि आदी असे.
श्लोकीं लौकिकपद्यबंधरचना नाना कवींची गिरा
शोभे या वसुधातळीं जनमुखीं, सौख्यप्रदा, सुंदरा. ५.

ऐका सांप्रत लौकिकक्रम असा उक्तादि षड्विंशतीं
छंदीं वृत्त अपूर्व पूर्वॠषिनीं नानागणीं संस्कृतीं
केली पद्धति ते सुदेशवचनें जाणावया प्राकृता
छंदःशास्त्रविशारदें निरचिली संतोषदात्री सतां. ६.

---

## संज्ञाप्रकरणम्.

म्यरस्तजभ्नगेलांतें, ऐशीं हेचि दशाक्षरें.
वाङ्मात्र व्यापिलें येंहीं, कृष्णें त्रैलोक्य ज्यापरी. ७.

गुरु संज्ञा अशी दीर्घसंयुक्ताक्षरआद्यकीं;
विसर्गबिंदुसंयुक्तां, विकल्पें चरणांतिचे. ८

गुरु संज्ञा वक्र रेखा, ऋजु रेखा लघुस्थळीं.
प्रस्तार लेखनी आहे रीति हे ऋपिनिर्मित. ९.

अब्धिभूतरसाश्वांची जाण संख्या, जशी जनीं.
पद तोचि चतुर्थांश, जैसा योजेल ज्या गणीं. १०.

आदिमध्यांत जाणावी लघुता य र तां गणो
भ ज सां गुरुतायोग, म नां गौरवलाघव. ११.

मा भू, श्रीद, गुरू तीनी; य पयोवृद्धि, आदिल;
र मध्यलाऽग्नि, दे अंत; स वायु, भ्रमणांऽतग; १२.

त व्योमांऽतल, दे हानी; ज सूर्य, गुरुमध्य, रुक्,
भ चंद्र, यश दे, गाद्य; न स्वर्ग, त्रिल, आयुषें. १३.

दैताति देवता साम्य, फळें वृत्तांसि योजितां.
मंगलाचरणीं माद्य योजिजे सर्वमंगल. १४.

यतिविच्छेदविश्राम ऐसी विरति जाणिजे;
यतिभंग जसा नोहे, श्लोक तैसाचि योजिजे. १५.

वर्णमात्रावृत्त तथा गणवृत्त ययापरी
त्रिधा संज्ञा असे केली पिंगलादि ऋषीश्वरीं. १६.

समवर्ण चतुष्पाद छंद पड्विंशति क्रमें
वर्णवृत्त अशी संज्ञा जाणिजे चतुरीं ययां. १७.

आर्याभेद समस्तांतें, गणवृत्त ययापरी;
संज्ञा पिंगलसूत्रीं हे केली तत्वविचक्षणें. १८.

वैतालीय, यथावत् मात्रासमक भेद हे;
मात्रावृत्त अशी संज्ञा सर्वज्ञें स्पष्ट दाविली. १९.

गणमात्रावृत्त सर्व जातिनामेंचि रूढलें.
व्यक्ति या समपादांतें पूर्वाचार्यी निरूपिलें. २०.

जातिव्यक्तिद्वयामध्यें छंदःशास्त्र विरूढलें;
जैसें पुंप्रकृतिस्थानीं जग निर्माण जाहलें. २१.

भाषाकविजनां नाहीं उपयोग म्हणौनियां,
व्यक्तिस्वरूपमात्रांतें वर्णिलें वृत्तविस्तरें. २२.

पद्यार्यागीतिभेदांतें त्रयमात्र निरूपिलें.
समार्धविषमांचाही दावितों मार्ग ये स्थळीं. २३.

त्रिधा दंडकभेदाचें रूपही दावितों पहा.
अनुष्टुपाख्य तेंही मी आता लक्षण बोलतों. २४.

प्रस्तारादिक षडाव त्यांत तीनि विचक्षणा;
निवडोनि करूं व्यक्त चमत्कारार्थ या मना. २५.

---

## आर्याप्रकरणम्.

### पथ्या.

आर्याप्रथमे पादीं द्वादश मात्रा तशा तृतीयातें;
अष्टादश, द्वितीयीं, चतुर्थकीं पंचदश पथ्या. २६.

### आर्यागीति.

आर्येचा पूर्वार्धीं लक्षण तें सर्व उत्तरार्धातें.
आर्यागीति अशी हे संज्ञा केली भुजगमाधीशें. २७.

### उपगीति.

उपगीति ईशें संज्ञा पूर्वार्धी उत्तरार्धातें,
विदुषें उत्तरभागीं पूर्वार्धातें नियोजिजे स्वार्थें. २८.

## वर्णवृत्तप्रकरणम्.

### षड्विंशति छंदनामें.

युक्ता १, अयुक्ता २, मध्यमा ३, प्रतिष्ठा ४, सुप्रतिष्ठा ५, गायत्री ६, उष्णिक ७, अनुष्टुप् ८, बृहती ९, पंक्ति १०, त्रिष्टुप् ११, जगती १२, अतिजगती १३, शक्वरी १४, अतिशक्वरी १५, अष्टी १६, अत्यष्टी १७, धृति १८, अतिधृति १९, कृति २०, प्रकृति २१, आकृति २२, विकृति २३, संस्कृति २४, अभिकृति २५, उत्कृति २६.

**सुप्रतिष्ठा—५.**

पंक्ति. गण—भ, ग, ग.

पंक्तिसुनामें । गाजत नेमें. । भोगवती हे । सप्रिय आहे. २९.

प्रीति. *गण—र, ग, ग.*

गोंगा योजी तू; । प्रीति पावें तू. । पडिता देते । तोष सर्वांतें. ३०.

**गायत्री—६**

वसुधा. गण—स, स.

स युगीं वसुधा । रमवी वसुधा. । सुरलोकसुधा । कारें साच मुधा. ३१.

शशिवदना. गण—न, य.

नयुत आहे । शशिवदना हे, । म्हणुनि इचा तू । धरिं बहु हेतू. ३२.

मातंगी. गण—म, म.

मा दोनी ते योजा । मातंगी हे योजा.
भावें पूजा ईतें, । देते सर्वार्थांतें. ३३.

उष्णिग्—७

मद्लेखा. गण—म, स, ग.

मा सांतीं गुरु लेखा; । शोभे हे मद्लेखा.
मातंगी, मधुरेखा, । तैशी हेचि सुरेखा. ३४.

मधुमती. गण—न, भ, ग.

मधुमती न भ गा । कविजनीं उमगा.
तारि रसें भरिता । प्रसुख दे कविता. ३५.

कुमारललिता. गण—ज, स, ग.

ज सा ग युत ते, गा, । कुमारललिता गा;
करीं धरुनि वीणा । प्रदोष कारि, जाणा. ३६.

हंसमाला. गण—स, र, ग.

स र गा हंसमाला । विरची पुण्यशीला,
कविता राजबाळा । मिरवे चारुलीला. ३७.

हेमाक्षी. गण—म, म, ग.

मा दोनी गा पादांतीं । हेमाक्षी हे वृत्तातीं.
गुर्वी सातां वर्णांची, । इच्छा पुर्वी कर्णांची. ३८.

सुमना. गण—न, न, ग.

न न गुरु सुमना । रमविल सुमना.
रसलघुगयुता । रसिकजनमता. ३९.

अनुष्टुप्—८

चित्रपदा. गण—भ, भ, ग, ग.

भ द्वय दोनि गुरूंचा । चित्रपदा सुगुणांची.
पंडितमानसहारी, । वर्णजनांत विहारी. ४०.

विद्युन्माला. गण–म, म, ग, ग.

मा मा गा गा विद्युन्माला । दों मार्गांनीं योजी बाला.
वाणी शोभे ईचां संगें । संतांचां हे चित्ता रंगे.　　४१.

माणवक गण–भ, त, ल, ग.

भा त ल गा माणवका । योजिशि तू सद्गुणका,
पावशि सौख्यामृत तें । या भुवनांतीं, सुमते.　　४२.

प्रमाणिका अथवा नगस्वरूपिणी.
गण–ज, र, ल, ग.

ज रीं ल गीं प्रमाणिका । सुयोजिशी प्रमाणिका.
इलाचि बोलती जनीं । कवी नगस्वरूपिणी.　　४३.

## बृहती—९

हलमुखी. गण र, न, स.

रा न साक्षर हलमुखी. । हे निघे जरि कविमुखीं.
धन्य तो वसुरहितही । शोभतो नृपसम मही.　　४४.

भुजगशिशुभृता. गण–न, न, म.

भुजगशिशुभृता नां में । रचिशि गुणवती नेमें,
निघल अमृतशी वाणी । सुरपतिगुरुही वाणी.　　४५.

## पंक्ति—१०

मयूरसारिणी. गण–र, ज, र, ग.

रा ज रं ग युक्त योजि वृत्ता । शोभशील सज्जनीं सुवृत्ता.
हे मयूरसारिणी सुवाणी । रंजवी मना प्रमोदखाणी.　　४६.

रूपवती, रुक्मवती अथवा चंपकमाला.
गण–भ, म, स, ग. यति–५, ५.

भा म स गांतीं रुक्मवती हे । योजुन लोकीं सयश लाहें
पंचकयुग्मीं साधिं यती तूं. । चंपकमाला भोगिं सती तूं.　　४७.

कमला. गण—स, म, स, ग. यति—५, ५.

स म सा गां तीं वृत्त करी तूं. । कमलानाथीं प्रेम धरीं तूं.
यति दों वाणीं योजुनि आणीं; । सुजनीं शोभे तें तव वाणी. ४८.

मत्ता. गण—म, भ, स, ग. यति—४, ६.

जाणीं मत्ता म भ स ग युक्ता. । सर्वांमध्यें सखि अति शक्ता.
अब्धीवेंद्रीं भज यति मानें. । स्वर्गीं देवीं फिरशि विमानें. ४९.

मनोहरा. गण—न, र, ज, ग.

न र ज गीं मनोहरा वरी. । सुनर सेविती इला जरी,
परम पावती सुखासि ते; । सुजनमान्य ते, महामते. ५०

भामिनी. गण—र, र, र, ग.

र त्रयांतीं गुरू येक साजे, । भामिनी नाम तीचें विराजे.
मानली सत्कवींलागिं चित्ता. । योजते पुण्य तें, भाग्यवंता. ५१

मनोरमा. (कामदा) गण—र, य, ज, ग.

हे मनोरमा रा य जा गुरू, । सत्कवी जनां फार आदरू.
रंजवी मना पद्मलोचना, । अंगनामणी, आणि लोचना. ५२

## त्रिष्टुप्—११

इंद्रवज्रा. गण—त, त, ज, ग, ग. यति—५, ६.

हे इंद्रवज्रा त त जा ग युग्मीं. । योजी, प्रिया, तू; धरिं कीर्ति, लक्ष्मी.
पांचा, सहांनीं यति तूं विचारीं, । जो वृत्तवृंदीं अतितोषकारी. ५३.

उपेंद्रवज्रा. गण—ज, त, ज, ग, ग. यति—५, ६.

उपेंद्रवज्रा ज त जा ग गां हीं । रचोनि, ताता, जयवंत होई.
असे यतीही शरपट्कवर्णीं, । जसा दिसे रंग तया सुवर्णीं. ५४.

## उपजाति.

हे वृत्त दोनी मिळती स्वभावें । पदोपदीं ते उपजाति नांवें.
होवोनियां सकर, भेद याचे । अनेक होती कविवृंदवाचे. ५५.

वृत्तद्वयीं या यतिनेम नाही, । असें कितेकी कथिलें कवींहीं.
जसा घडे श्लोक तसा करी तूं, । नको धरू नेम यतीवरी तू ५६.

## सुमुखी. गण—न, ज, ज, ल, ग.

न ज ज ल गीं कथिली सुमुखी. । कविवर वर्णिति ईस मुखीं.
सुजनवरां कवि पूर्ण सुखी, । म्हणुनि रची गणयुक्त सखी. ५७.

## दोधक. गण—भ, भ, भ, ग, ग.

दोधक भत्रय दोनि गुरूंनीं । योजि भुजंगम सूत्रविधानीं.
सत्कविमंडण पद्य रचोनी, । पाव जगीं यश, सद्गुणखाणी. ५८.

## शालिनी. गण—म, त, त, ग, ग. यति—४, ७.

आहे उक्ता शालिनी या प्रकारीं. । योजीं ऐशी मा त ता दों गकारीं.
विश्रामातें जाण तूं अब्धिलोकीं. । वृत्तांमध्यें मानिली श्रेष्ठ लोकीं. ५९.

## वातोर्मी. गण—म, भ, त, ग, ग. यति—४, ७.

वातोर्मी हे वद मा भा त गो गीं. । विश्रामा देउनि धीलोकसंगीं
ईची गोडी कथिजे काय तोंडें? । श्लोका योजीं चतुरालागिं जोडे. ६०.

## श्री. गण—भ, त, न, ग, ग. यति—५, ६.

भा न त गा गीं पवन रसानीं । श्री सुखदात्री भजनविधानीं.
हे कविमान्या, सरस, गुणांची, । पूर्ण करीजे भडस मनाची. ६१

## भ्रमरविलसिता. गण—म, भ, न, ल, ग. यति—४, ७.

म्भा ना ला गा भ्रमरविलसिता । ....................
सिंधुस्वर्गीं गति यति समजें । दुर्बुद्धीतें किमपि न समजे. ६२.

रथोद्धता. गण—र, न, र, ल, ग. यति पदांतीं.

रा न रीं ल ग युता रथोद्धता । ज्या नरीं विरचिली महोन्नता,
विश्रमारहित पावती पदा । लोकदुर्लभ अपारसंपदा. ६३.

स्वागता. गण—र, न, भ, ग, ग.

स्वागता र न भ युग्मगुरूंशीं । योजिशील जरि सद्गुणराशी,
पावशी सुयशमौक्तिक हातीं, । मान्य होशिल बुधीं गुणवंतीं. ६४.

वृत्ता. गण—न, न, स, ग, ग.

न न स ग गुरु रचिता वृत्ता । समजुनि करि कविता, ताता.
तवगुणगण इह लोकांतीं । प्रगट करुनि, लभ विश्रांती. ६५.

भद्रिका. गण न, न, र, ल, ग.

न न र ल गुरुची सुभद्रिका । विरचुनि कविता सुभद्रिका,
यश जगिं मिरवीं गुणाकरा । जिणुनि कविरसें सुधाकरा. ६६.

मौक्तिकमाला. गण—भ, त, न, ग, ग.

मौक्तिकमाला भ त न ग गांता । योजुनि अर्पी कविवरसंतां.
डोलसि तेव्हां परम सुखानें, । वानिति जेव्हां सुजन मुखानें. ६७.

कुसुममालिका. (शुद्धकामदा) गण—न, र, र, ल, ग.

न र र ला ग कां काव्यकूसरी । कुसुममालिका योजिजे बरी.
सुखवि, रंजवी हे मनोरमा; । म्हणुनि वर्णिती लोक सत्तमा. ६८.

जगती—१२

चंद्रवर्त्म. गण—र, न, भ, स.

चंद्रवर्त्म कथिशील र न भ सीं । भारती प्रविलसेल कविरसीं.
मान्य होसिल बुधांसि नृपकुळीं. । वश्य होईल समुद्रपट इळा. ६९.

इंद्रवंशा. गण—त, त, ज, र.

रे, इंद्रवंशा त त जें र संयुतें. । देवेंद्रवज्रीं लघु एक विस्तृतें.
हा वृत्त जाणें उपजाति ये स्थळीं । पूर्वप्रमाणें घडती सुनिश्चळीं. ७०.

वंशस्थ. गण—ज, त, ज, र. यति

उपेंद्र वंशस्थपणें सुखें घडे । ज तीं ज रीं हा गणमेळ सांपडे,
विभांग जाणोनि कवी यथाविधी । नियोजिती युग्मसुवृत्त सत्पदीं. ७१.

तोटक. गण—स, स, स, स.

करि तोटकवृत्त चतुः सगणें. । सकळां तरि भूपति यासि म्हणें.
अमरा सुनरां प्रिय हाचि घडे. । म्हणवोनि वदें तुजला उघडें. ७२.

द्रुतविलंवित. गण—न, भ, भ, र.

द्रुतविलंवित जाण न भीं भ रीं. । वदल हे जरि सत्कविवैखरी.
सरस राजसभेंत दिसे भला. । घडल हा विबुधीं अति शोभला.७३.

प्रमुदितवदना. गण—न, न, र, र.

प्रमुदितवदना घडे दों न रीं, । म्हणुनि अति विलासिनी हे बरी.
जपुनि विमल वृत्त तू सांवरी, । तरि यश विलसेल सर्वांतरीं. ७४.

कुसुमविचित्रा अथवा जलधारा. गण—न, य, न, य.

द्वि न य समेता कुसुमविचित्रा । रमवि मनातें सरसिजनेत्रा.
समज इयेची रति अति चित्रा । रसिक जनांची रुजहर मात्रा. ७५.

जलोद्धतगति. गण—ज, स, ज, स. यति—६, ६.

ज स द्वययुता जलोद्धतगती. । रसद्वयकृता असे सम यती.
सुचे मतिमता इची विरचना, । रुचे कविजनां, शुची करि मना. ७६.

भुजंगप्रयात. गण—य, य, य, य.

भुजंगप्रयाता घडे चौं यकारीं. । कवी जाणते योजिती या प्रकारीं.
भुजंगेशतुल्यासि हा वृत्त मानें, । रचीं पद्य येणें करीं नामगानें. ७७.

स्रग्विणी. गण-र, र, र, र.

चौं रकारीं घडे स्रग्विणी सुंदरी । हे जयाचा असे नित्य वाङ्मंदिरीं,
तो दिसे धन्य लोकीं कवींचां गणीं, । मुख्य वाचस्पती ठेंगणा तो गणीं. ७८.

मणिमाला. गण—त, य, त, य. यति—६, ६.

ता या त य मिश्रा शोभे मणिमाला. । ईचा रसयुग्मीं योजीं मति, बाळा.
घाते कविराणीं ईशीं अति मोला, । भोगीं, मानिभता, वेगीं शुभलीला. ७९.

ललिता. गण—त, भ, ज, र.

ता भा ज रींच ललिता लता घडे. । ईचा फळींच रस सर्व आतुडे.
हे पंडिता, कविवरासि मानली, । याकारणें तुज मनोज्ञ वाणिली. ८०.

प्रमिताक्षरा. गण—स, ज, स, स.

प्रमिताक्षरा स ज स सीं गदिता. । कविताक्षरीं जरि घडे उदिता,
तरि ते सखी सुचतुरा सुजना, । सरसानना विरचि तोष मना. ८१.

नवमालिनी. गण—न, ज, भ, य.

रचि नवमालिनी न ज भ यांनीं । हरिपद अर्चिशी विधिविधानीं.
परपुरुषार्थ पावशि वरिष्ठा. । इहसुख सर्व भोगिसिल, इष्टा. ८२.

प्रभा. गण—न, न, र, र. यति—७, ९.

स्वरशरयतिची दिनारीं प्रभा । दिनमणिकिरणीं जशी सुप्रभा.
निरसन करिते हृदिस्थोत्तमा । विकसनि गुणपंकजा सत्तमा. ८३.

मालती. गण—न, ज, ज, र.

न ज ज र गुंफित मालतीस्रजा । करिशि समर्पण जैं अधोक्षजा;
तरशि भवार्णव तू पळातरीं, । परिणिशि त्याच विमुक्ति नोवरी. ८४.

अतिजगती—१३.

क्षमा. गण—न, न, त, त, ग. यति—७, ६.

न न त त गुरुची ते बुद्धावी क्षमा । हयरसयतिची हे गुणाढ्या रमा.
अभिमत फळ दे जे अमित्रांतका । परगति शुभधी महत्प्रकाशिका. ८५.

प्रहर्षिणी. गण— म, न, ज, र, ग. यति–३, १०.

मा ना जीं र गुरुयुता प्रहर्षिणी हे
जाणावी त्रिदशयती सुहर्षिणी हे.
योजावी गणगुरुयुक्त पद्यकामीं.
पावावी अमित सुकीर्ति याच भूमीं. ८६.

रुचिरा. गण–ज, भ, स, र, ग. यति–४, ९.

ज भा स रा गुरु, रुचिरा योजि आतां.
सुधाब्धिशीं ग्रहयति जाणोनि घेतां.
घडे सुखें न करुनियां त्वां प्रबंधा.
नृपांगणीं यश जय पावे सुबुद्धा. ८७.

उर्वशी. गण–न, त, त, त, ग.

न त त ता गीं सुखाची घडे उर्वशी.
कठिण यज्ञादि कर्मे मिळे उर्वशी.
जरि तिचां भोगकामीं तुला आवडी
विहितमार्गेचि नेयीं घडीनें घडी. ८८.

चंचरीकावली. गण–य, म, र, र, ग. यति–६, ७.

य मीं रा रा गां हीं चंचरीकावली हे.
यती पट्टीं, लोकीं योजितां सौख्य लाहे.
हृदंभोजस्थानीं सर्वदा ठेवि यीतें.
इचा नादें होशी थोर संतुष्ट चित्तें. ८९.

मत्तमयूर. गण–म, त, य, स, ग. यति–४, ९.

मा ता यां सीं योजि गुरू मत्तमयूरी.
वेंदी, रंध्रीं विश्रम जाणें सुखकारी.
याची आहे आवडि सर्वा सगुणांतें;
वृत्तांमध्यें रंजविता हाचि मनातें. ९०.

मत्तहासिनी. गण—ज, त, स, ज, ग. यति–५, ८.

ज तीं स जा गीं घडत मत्तहासिनी.
यती शरार्थी विमल योजिं सद्गुणीं.
करी मना हे कुतुक फार चातुरा.
विराजिता हे नटवधूत हे धुरा. ९१.

मंजुभाषिणी. गण—स, ज, स, ज, ग. यति–५, ८.

स ज सा ज गीं रचिशि मंजुभाषिणी,
सरसानना, शरवसू अपेक्षिणी.
वसते मनीं जरि इच्छा सुखीं स्पृहा,
द्रविणें करीं वश विलासिनी महा. ९२.

चंद्रिका. गण—न, न, त, र, ग. यति–८, ९.

न न त र गुरुवर्ण सुचंद्रिका हे.
विकसवि कविचित्ता प्रकाशिनी हे.
समजशि यति वेदद्वयें, शरानें.
अति सुखमय मेवीं प्रियेशि मानें. ९३.

शक्करी—१४.

असंबाधा. गण—म, त, न, म, ग, ग. यति–५, ९.

मा ता सा ना गा गुरुसहित असंबाधा
तेव्हां तूंही तो परिहरि जानें सबाधा.
टाकीं पाचातें ग्रहसह धरिं विश्रामा.
ध्यायीं भावें त्या अहरह हृदयीं रामा. ९४.

अपराजिता. गण—न, न, र, स, ल, ग. यति–७, ७.

न न र स लघु गाक्षरीं अपराजिता.
रसिकजन करी सुखी गुणमंडिता.
द्वयहय यति हे धरी सुयशस्करी,
म्हणउनि रचिजे बुधीं नरशेखरीं. ९५.

महरणकलिका. गण—न, न, भ, न, ल, ग. यति—७, ७.

न न भ न ल ग हे महरणकलिका.
विकसन करितां प्रसुख सकळिकां.
यति सम तुरगीं विरचिशि चतुरा,
तरि दिसशिल तूं कविशिरसिं तुरा. ९६.

वसंततिलका. गण—त, भ, ज, ज, ग, ग.

ख्याता वसंततिलका त भ जा ज गौ गे.
सोमें इला निगदिलें मधुमाधवीं हें.
सिंहोन्नता म्हणुनि हें मुनि कश्यपानें.
उद्धर्षिणी च कविराज वसुंधरानें. ९७.

इंदुवदना. गण—भ, ज, स, न, ग, ग.

इंदुवदना भ ज स ना दि गुरुयुग्में.
शोभित करी सकळ रत्नमय सद्में.
दुर्लभ असे सुकृतहीन पुरुषातें.
फार तप जो करिल पावल अशी तें. ९८.

लोला. गण—म, स, म, भ, ग, ग. यति. ७, ७.

मा सा मा भ ग गां नीं, द्विःसप्तीं यति, लोला.
हे आहे शुभवेळा संयोजीं गुणशीळा.
हातीं हे न धिरे, मा जैशी विद्युतलीला.
राहे सावध ईचां कंठीं अर्पुनि माळा. ९९.

## अतिशकरी—१५

मालिनी. गण—न, न, म, य, य. यति- ८, ७.

न न म य य युता हे मालिनी रम्य योषा.
वसुहयवतिमंता शोभते चारुवेषा.
जरि हित तुज वाटे संग ईचांगिकारीं
रमविल तव चित्ता साच सर्वां प्रकारीं. १००.

सुकेसरा. गण—न, ज, भ, ज, र, यति. ७, ८.

न ज भ ज रा युता रचिशि जै सुकेसरा,
 कवि तुजशीं तुलाचि नपवेल दूसरा.
यति इयअष्टकीं भजसि वृत्त रक्षुनी
 तरि कविता घडे मधुरसाद्य या जनीं. १.

शशिकला. गण—न, न, न, न, स. यति पादांतीं.

मणिनिकर. गण—न, न, न, न, स. यति. ७, ८.

द्विहय लघु, गुरु, शर, गण शशिकला
 कुकविहृदयसरसिज करि विकला.
बुधजनमति अति रमविल रमणी.
 वसुहययति तरि, मणिनिकर गणीं. २.

सहृदळा. गण—स, ज, न, न, स. यति. ५, १०.

स ज ना न सीं शरदशयति सहृदळा.
 सुजना गणी परम सुखद कविकुळा.
भजसी इतें अविकळ तरि परपदीं
 रमसी तसा हरिहरसुरवरविधीं. ३.

प्रभद्रक. गण—न, ज, भ, ज, र.

न ज भ ज रा गणीं घडतसे प्रभद्रक.
 चतुरपणीं यथाविध रचोनि सम्यक
जगतितळीं करीं प्रकट सार सद्गिरा
 रमवि मना जशी अखिल सत्कवीश्वरा. ४.

कामक्रीडा. गण—म, म, म, म, म.

पश्चा वर्णी गुर्वंगी ते कामक्रीडा योजावी
 ईचा भोगीं इच्छा तूतें, तें तो माळी पाजावी.
नाना गोडा गोष्ठी ईतें बोलोनीयां मोहावी.
 वेश्या नारी चित्ता चोरी, माया ईची जाणावी. ५.

## अष्टि—१६.

वाणिनी. गण—न, ज, भ, ज, र, ग.

न ज भ ज रीं ग युक्त सति वाणिनी भजावी.
वसु वसु विल्व वाहुनि यतीश्वरीं पुजावी.
नियतमनें वरी हृदयिं आणिजे भवानी.
मग न घडेल साच जनिं मृत्यु या भवानी. ६.

चामरी. गण—ज, र, ज, र, ज, ग.

लघू गुरू निरंतरीं प्रयोजि वृत्त चामरी,
तदा नरेंद्र वीजितील रत्नदंडचामरीं.
प्रकामदा घडेल तूज भारती यशस्करी
गुणाढ्य सर्व भूसुरांत शोभशी बुधां शिरीं. ७.

## अत्यष्टि—१७

कुसुमशर. गण.—न, न, न, न, न, ग, ग. यति—१०, ७.

कुसुमशर·न गण शर, गुरु युगुल अंतीं.
यति दशकहयसहित विहित पद चित्तीं.
न वडलचि किमपि तुज कुसुमशरवाधा,
रतिरमणपितृचरण जपसि सहराधा. ८.

शिखरिणी. गण—य, म, न, स, भ, ल, ग. यति—६, ११.

य मा ना सा भा ला ग, यति रसरुद्रीं शिखरिणी,
रसामध्यें आम्रीं फळजनित जैशी शिखरिणी.
कवीला हे गोडी बहुतपरि देते शुभगुणा
गणावृत्तांमध्यें धुरिं वरिच सर्वांस निपुणा.

पृथ्वी, गण—ज, स, ज, स, य, ल, ग. यति ८

ज सीं ज स य ला गुरूसहित जाण पृथ्वी व
समस्त फळ दे जना यति वसुमहीं आदरी.
सुराज्यघटना करी कविवरांशि हे सर्वथा.
प्रमाणगणलक्षणें करिं कवित्व विश्रामता.

हरिणी. गण—न, स, म र, स, ल, ग. यति—६, ४, ७.

न, स, म, र, स, ला, गा वर्णांनीं जपें हरिणी धरीं.
भज यति रसीं, वेदीं, सातीं, कवी म्हणवी जरी.
सुजनचतुरां चित्ता माने जसी तव वैखरी,
प्रथन करिजे मुक्तादामासमा मधुराक्षरीं. ११.

मंदाक्रांता. गण—म, भ, न, त, त, ग, ग. यति—४, ६, ७.

मंदाक्रांता म भ न त त गीं योजिजे छंदवेत्तीं.
विश्रामा घे जलनिधि, रसीं, पवर्णीं, तूं पवित्रीं.
ईशीं साजे कविवरगिरा मंडळीं सत्कवींचा
तेव्हां शोभे गुणमणि बरा साम्यतेनें रचीचा. १२.

नर्कुटक ( नर्दटक ).

गण—न, ज, भ, ज, ज, ल, ग. यति पादांतीं.

कोकिलक. गण—न, ज, भ, ज, ज, ल, ग. यति—७, ६, ४.

न ज भ ज जा ल गीं नियत नर्कुटकासि रचीं.
अयति असे तदां विहित नामाचि देत रुची.
मुनिगुहसागरीं यति घडे तरि कोकिलक.
वदति कवी सुधी विविध रजवि हा सुमुख. १३.

धृति—१८

कुसुमितलता. गण—म, त, न, य, य, य. यति—५, ६, ७.

वृत्ता योजीं, गा, म त न य य या अक्षरीं युक्तिमंता;
वृत्तामध्यें हे कुसुमितलता मुख्य कांता वसंता.
चित्तातें देते प्रमुख निववी अंतरा चारुगंधा.
भूतीं, पद्मार्थीं यति भज, सखे; ना मिळे बुद्धिमंदा. १४.

कोकिला. गण—न, न, र, र, र, र. यति–१०, ८.

न न रजलधि अक्षरांनीं वरी योजिजे कोकिला.
निववि मधुरागगानें थया सर्व भूमंडळा.
सुकुसुमितरसालभूपा असे श्री जशी कानना
विरति दशवसूसमेता प्रिया मानली सज्जनां. १५.

मल्लिका. विबुधप्रिया गण—र, स, ज, ज, भ, र.

रा स जा ज भ रा गणीं जरि गुंफिशी नव मल्लिका,
कंठगा विलसे, तदा कविमंडळीं दिससी निका.
हे वसंतविभूषणा सकळां जनांप्रति आवडे
सौरभें मन पूर्ण हे करि कोण वर्ण्य इचां पुढें ? १६.

## अतिधृति—१९

### शार्दूलविक्रीडित.

गण—म, स, ज, स, त, त, ग. यति–१२, ७.

सूर्याश्वीं म स जा स ता त गुरुसीं शार्दूलविक्रीडिता
योजीं, सत्कविराजसद्गुणवरीं तू पावशी मान्यता.
हा पंचाननराव वृत्तविपिनीं; गर्जोनि पर्वे मृगें
केलीं त्रस्त, इतस्तता वसति तें झांकोनि वक्त्रें उगें. १७.

## कृति—२०

सुवदना. गण–म, र, भ, न, य, भ, ल, ग. यति–७, ७, ७.

मा रा भा ना य भा ला गुरुगणसहिता ख्याता सुवदना.
विश्रामा सप्तसप्ताक्षररससहिता प्रेया कविजनां.
कोणा योजेल नारी सरस-गुणवती भाग्यें जरि, तया :
पृथ्वीमध्यें न जोडा; यश अतुल मिळे, साधे सुख तया. १८.

मत्तेभविक्रीडिता.

गण—स, भ, र, न, म, य, ल, ग. यति—१३, ७.

स भ रा ना म य लाग अक्षरगणीं मत्तेभविक्रीडिता.
सुगुणे योजिसि वृत्तशास्त्रनिपुणा स्वच्छंद तू आयिता,
तरि गा पावशि सयश त्रिभुवनीं, साधूजनीं मान्यता,
त्रिदशीं निश्रम अश्ववर्णसहितें गुंफोनियां, पंडिता. १९.

प्रकृति—२१

स्रग्धरा. गण—म, र, भ, न, य, य, य. यति—७, ७, ७.

मा रा भा ना य या या मुनिगणसहिता योजिजे स्रग्धरा हे.
विश्रामा अश्वयुक्तत्रिविधपरिकरीं तैचि सद्वृत्त आहे.
सर्वी पद्यांत ईचा बहुतचि विलसे मान, मान्यां समस्तां.
आर्यीं सर्वां कवींचा वचनमुखपटा हेचि येते प्रशस्ता. २०.

कनकलता. गण—न, न, न, न, न, न, स.

रसमितनगणसगणयुत अभिमत कनकलता.
कवि जननिपुणविरचित अतिसुखकर बुधनुता.
सरस रसभरित गतिहित यतिरहित सुहिता,
निवविं मन सुमनतरुसुमनसम सुमनसवता. २१.

मदनसायक. गण—न, भ, न, भ, न, भ, र. यति—१२, ९.

न भ अनुक्रम गण सहा, मग रगण योजुनियां वरी,
यति दिवाकरनिधि सद्वृत्त विमल वर्ण भरोवरी.
मदनसायक कविजनांप्रति करिल कौतुक मानसा.
नृपसभासदिं वचनभूषण चतुरतोषण दे रसा. २२.

आकृति—२२.

कल्पलतिका.

गण—त, भ, य, ज, स, र न ग. यति—७, ७, ८.

ता भा य जा स र न गा युक्त, सप्तहयनागांत, कल्पलतिका.
योजेल ज्या कविस तो धन्य भूमिवरि सन्मान्य तो सकळिकां.

देते अभीष्टफळ पद्यावळी सरसवर्णी अशा विरचिता.
कर्णासि जे अमृत, वर्णावया उचित, गीर्वाणदेशिकनुता. २३.

## विकृति—२३

### हेमकला (मदिरा).

गण—भ, भ, भ, भ, भ, भ, भ, ग, ग. यति—१२, ११.

सप्त भकार गुरुद्वय भास्करशंकरविश्रम हेमकला हे.
हेचि उमा म्हणवोनि कितेक कवी वदती गुणसागर पाहें.
प्राकृत लोक न जाणति मूळ, उगेंच इला कथिताति सवाई.
एक गुरू किति एक नियोजिति अंतपदीं अविचारित पाही. २४.

### सोमकला.

गण—न, ज, ज, ज, ज, ज, ज, ल, ग. यति—७, ६, १०.

न जरस एक लघू गुरु अंतिम पादयुगीं रचि सोमकळा;
शुभगुणमंडित, मानिति पंडित, वंद्य समस्त नरेंद्रकुळा.
यति मुनिसद्रसपङ्क्तिशुभाक्षर योजुनि निर्मिशि, तीचि कुळा
यश जगतींत मिळेल अमोलिक, जाणुन पावति लोक तुळा. २५.

## संस्कृति—२४

तन्वी. गण—भ, त, न, स, भ, भ, न, य. यति—५, ७, १२.

भा त न सा भा भ न य गणयुता भूतमुनी दिनकरयति तन्वी.
योजुनि पाहें गुणवति सुगुणी देइल ते रतिसुख तुज तन्वी.
प्राप्ति इयेची गुणलिपिसम ते दुर्लभ या भुवि कविश्रमातें.
शोधुनि पाहें, बुधमणि कवणी सुंदरि ईसम रमवि मनातें. २६.

## अतिकृति—२५

### वंधुर.

गण—न, न, न, न, स, भ, भ, भ, ग. यति—५, ५, ५, १०.

न न न न स भ भ भ सगुरु विरचितां वंधुरनाम घडेल, सुता.
त्रिकशरयुत यति दिगसह गणितां, वृत्त सुशोभित होय यथा.

कुजरमतिस तारें अति कठिण दिसे; रंक न पावत इंद्रपदा.
सुकृतरहित हरिभजनविरहितां केंवि घडे सुख पूर्ण कदा ! २७.

## कामकळा.

गण—स, स, स, स. स, स, स, स, ग. यति—७, ६, १२.

स गणाष्टक एक गुरूसें पदांत करी तारे होईल कामकळा हे.
अति पावन, पूर्ण करी कविकाम समस्तहि, दैवत विप्रकुळा हे.
प्रतिनित्य पुजोनि इला भजतांचि मना स्फुरवि बुधलोकनुता हे.
हयपङ्क्तिभानुकळा मणिभर्म तया सदनीं वसवीत सदा हे. २८.

## उत्कृति—२६.

## सुधा.

गण—ज, स, न, भ, ज, स, न, भ, ल, ग. यति ८, ८, १०

ज सा न भ ज सा न भ लगांतक पदांतक वसुद्वयदशीं कारें सुधा.
यथाविध असा रसभरा मधु, तसा रचें यथारुचि सुतोषण बुधा,
सुरासुरनरोरगमहाजनमनोहर, तपाश्रितमनोरथगणा-
चकोरककदंबक कलानिधिकलासम तुला धरि फलार्पणगुणा. २९.

## दंडक.

न गणयुगुळ यावरी सप्त रेफीं घडे चंडवृष्टिप्रपाताख्य हा दंडक. ३०.

प्रतिचरणवृद्ध रेफीं तदा अर्णअर्णार्णवव्याळजीमूतशंखादि
या नाम कीं दंडक. ३१.

भुजगपति स्वमुखाब्जें वदे यापरी न द्वयानंतरें य चकारें
घडे दंडकाळी विचित्रा. ३२.

# अर्धसमवृत्तप्रकरणम्.

## वियोगिनी.

चरण १ व ३. अक्षरें १०. गण–स, स, ज, ग.
चरण २ व ४. अक्षरें ११ गण–स, भ, र, ल, ग.

विषमीं स स जा गुरू; समीं । स भ रांतीं ल गुरू वियोगिनी.
कवि योजिति या गणक्रमीं, । तरि ते पावति मान सत्तमी. ३३.

## वेगवती.

चरण १ व ३. अक्षरें १०. गण–स, स, स, ग.
चरण २ व ४. अक्षरें ११. गण–भ, भ, भ, ग, ग.

स गणत्रय गा विषमांतीं, । साम्यपदीं भ भ भा ग ग येती;
तरि वेगवती शुभनामा; । जाणुनियां रचि सत्कवि नेमा. ३४.

## श्रुतमध्या.

चरण १ व ३ अक्षरें ११. गण–भ, भ, भ, ग, ग.
चरण २ व ४. अक्षरें १२. गण–न, ज, ज, य.

भ त्रय तें विषमीं गुरुयुग्मीं, । समपद ना ज ज यीं श्रुतमध्या
योजुनि या रिति वृत्त गणावा । चतुर, सुधी सकळांत म्हणावा. ३५.

## माल्यभारा.

चरण १ व ३. अक्षरें ११. गण–स, स, ज, ग, ग.
चरण २ व ४ अक्षरें १२. गण–स, भ, र, य.

विषमीं स स जा ग दोनि अंतीं, । समभागीं स भ रा य माल्यभारा.
करिं वृत्त असाचि पुण्यशीला, । तरि तें साच घडे प्रभातवेळा. ३६.

## पुष्पिताग्रा.

चरण १ व ३. अक्षरें १२. गण—न, न, र, य.
चरण २ व ४. अक्षरें १३. गण—न, ज, ज, र, ग.

न युग र विषमीं तसें य कारा. । समपद ना ज ज रा ग पुष्पिताग्रा.
गणुनि गण असे रचील वाणी । तरि पद पावल तो महामुजाणीं. ३७.

## विषमवृत्तम्.

चौं पादाचा चारी ईचा भिन्ना भिन्ना ग( ति हो )ती.
योजावी हे सरसा छंदोवेत्रीं विषमाक्षर पक्ती.
कामाक्षी या नामें शोभे सोळा चौदाची बाळा
( मत्ता )मात्रीं गणिता होल्ये वेश्या प्रेया गुणशीळा. ३८.

---

## अनुष्टुप्वृत्तम्.

श्लोके षष्ठ गुरु ज्ञेय सर्वत्र लघु पचमम्
द्विचुतु पादयो न्हस्त, सप्तम दीर्घमन्ययो।
प्रथमाक्षर सोडोनि चतुर्थाष्टम दों गणा
न योजिता समुद्रानीं या गणीं गुरु योजिजे. ३९.
सम पादीं ज काराशीं योजिजे य गणस्थळीं,
तदा पथ्यावक्र नामें अनुष्टुप् रूढि पावतें. १४०.

---

## प्रत्यय.

आधीं सर्व गुरू पादीं लघु योजीं गुरूपदीं.
यथापूर्वक देशेसीं जनीं दीजे गुरूचि तें. ४१.
ऐसा क्रम नियोजावा जो घडे सर्वही लघु.
प्रस्ताररीति हे ऐशी समजावी विचक्षणीं. ४२.
नष्टाचा जो घडे अंक तदर्धार्धी समीं लघु;
विषमीं योजिजे येक तदर्धार्धीं गुरू दिजे. ४३.
पादपूर्णार्थ तू देयीं लागले ते गुरू लघू.
तदा नष्टक्रियासाधे विधि साधे अनुक्रमें. ४४.

---

## उद्दिष्ट.

उद्दिष्ट तें वृत्त वर्णी द्विगुणांक लिहोनियां.
अंका मेळविजे सर्व लघुस्थानीं असेति जे. ४५.

त्यांतही मेळवीं येक गणोनि कथिजे तदा,
कितवा वृत्त हा आहे, चतुरीं पुसतां तुळा. ४६.

प्रत्यय त्रय हे ऐसे बुद्धी जाणोनि योजिजे;
सभास्थानीं जिणे सर्वा विदग्धकुळमडण. ४७.

श्लोकसख्यासार्धशतें आमूलाग्र अनुक्रमें
मुक्तावळी छद सूत्रें वोविली हे निरंजनें. ४८.

श्रीमन्माधवपडितेंद्रतनुजें सद्वृत्तमुक्तावळी
नानाछदसमुद्रसंभवमणी वेचोनियां ( गुफिली );
ते आणोनि समर्पिली बुधजनालंकार सतां पदीं,
साधु, श्रेष्ठ, महानुभाव, चतुरां हो मान्य ऐशा विधी. ४९.

सोळाशें त्र्यशिती शकीं, वृषमहासवत्सरारंभकीं,
चैत्रींचा प्रथमा दिनीं, प्रतिपदीं, वारीं शशीनामकीं.
झाला ग्रंथ समाप्त राघवकृपापांगें वनाजीमुखें
बाळांळागिं सुबोध पद्यरचना लोकीं घडाया सुखें. १५०

इतिश्रीमत्कविकुलतिलकवनाजीमाधवनिरंजनविरचिता
सद्वृत्तमुक्तावली समाप्ता.

---

# रसमंजरी.

## ( भैरव. )

आत्मीया चरणासि ठेवि पुढती निम्नोच्च भूमीवरि,
वेंची जो स्वकरेंचि पुष्प तरुचें, शंका श्रमाची धरी,
तसीं त्याहि मृगत्वचाविरचिता निद्रा स्वभागें करी,
अंतःप्रेमगरालसा प्रियतमा शंभू निजांगें धरी. १.

काव्यांत वर्णीति अनेक रसां रसज्ञ
शृंगार भूपति असें म्हणताति विज्ञ
आलंबना करितसे रतियुक्तकांता
वर्णी म्हणोनि कवि तो कुटिलालकांता. २.

विद्वत्कुलीनकविमानसभृंगपंक्ति
सत्काव्यकल्पतरुपुष्परसावसक्ती
पावो निरंतर, म्हणोनि विचित्रलीला
श्रीभानुमिश्र करितो रसमंजरीला. ३.

नेत्रीं गतागत, कुतूहल तें अपांगीं,
हास्यच्छवी विरमते अधरांशि आंगीं,
वाचा प्रिय श्रुतिसि गोचर, ते संकोपा
चित्तीं विरे, कुलवधू प्रकटी न कोपा. ४.

आज्ञापिलें नियत कामनहीपतीनें;
काळीं वरेंहि तरुणत्व महामतीनें
राहावयासि करि वास्तुविधी विचारें
एणीदृशातनुवरी त्रिविधप्रकारें. ५.

दृष्टी वरी रुचिर खंजनचातुरीला,
आस्यच्छवीतचि सुधाधर माधुरीला
वाचा वळावित असेहि सुधासमुद्रा
लावण्य भूपुरपतीसि सुधीं समुद्रा. ६.

नीरांतुनी प्रियतमा उपतीर झाली;
आकर्णलोचन असें न कळोनि झाली
शंका तयीं श्रवणिं उत्पल उग्र आहे
जाणावयासि कर ठेवुनि काय पाहे. ७.

शैवालअंकुर अशी धरुनीहि शंका,
रोमावळी पुशि शशीमुखि ते विशंका.
भ्रांती मुहुर्भज गमे सखये सुजाणे
ऐसें पुसे, तदपि श्रोणिभरा न जाणे. ८.

नीलोत्पलाभनयने, हि तुझा स्वयंभू
भासे पयोधर निरंतर जेंवि शंभू.
कोणा नखकरुनि होईल चंद्रचूड
धन्याचिये सदय ज्यावरि, चंद्रचूड. ९.

हस्तीं धरूनि जरि बैसविली पलंगीं,
आलिंगिली, तदपि बाहिर जाय वेगीं,
जाणों अशी नव वधू मग त्यासि वश्य,
जो पारदा स्थिर करील करें अवश्य. १०.

कांहीं करूनि मुकुलापरि नेत्रपाळी,
नीवीनिबद्धभुज, बद्धउरु-द्वयाळी,
हस्तीं धरूनि कुच, विश्वसिता नवोढा
स्वापा करी प्रियसमीप जडोनि गाढा. ११.

निद्रेंत कांतमुखवीक्षणहानि आहे,
जागेपणीं प्रियकरग्रहणासि पाहे;
ऐसी सरोजवदना करुनीहि चिंता,
स्वापा करूं न करूं कां म्हणुनी सचिंता. १२.

स्पर्शोनी स्तन, आंकळोनि वदना, भेटोनि कंठस्थळा,
चुंबूनीं अधरासि, अंबर तसें सांडूनि, पाहे भला;
सोडूनी चिकुर प्रभातसमया जाणावया शंकला,
वामाक्षी वसनांचळें छपविते तें कर्णनीलोत्पला. १३.

नखक्षत उरस्थळीं, अधरीं कंप दंतव्रणें,
तुटे बकुळमालिका, गलित फार मुक्ताफळें;
रतांतसमयांत म्यां सकळ हेंचि आलोकिलें
नसे स्मृति रतींपुढें, सखि, वृथाचि शिक्षापिठें. १४.

ज्यामाजि घोळ अलिपुंज अशा निकुंजीं
जातां वधुश्रमजलांकितअंगकीं जी,
याकारणें करुं गि इच्छितसें हिंवारा
तो धीर पद्मिनिदळींहि महा उदारा. १५.

त्वां केल्या रजनीस जागर, मला आरक्तता लोचनीं,
तूं प्याळारि मधु प्रकट, मजला संमोह झाला मनीं;
आम्यद्भृंगघनीं निकुंजभवनीं त्वां पाविजे श्रीकळा,
मारी तो मज पंचबाण दहनक्रूरां शरीं कोपला. १६.

कांतानुरागचतुरा, सुमनोहरा तूं
आहेसि नाथ नवयौवन, सुंदरा तूं;
ऐसें म्हणोनि करिते वदनीं प्रियाचे
निःश्वासबाष्पयुत पात दृगंचलाचे. १७.

नो तल्पा भजसी, न बोलसि सुधाधारेपरी चांगलें,
दृक्पाता न करीसि तूं परिजनीं क्रोधप्रकाशच्छलें,
ऐसें, केतकसुंदरी, करिसि तूं कोपासि संगोपना,
तें होईल हंसों नये जरि सखीवक्रीकृता आनना. १८.

आत्मीय प्रतिबिंब पाहुनि वरा चंद्रा कलेअंतरीं,
शंभूमस्तकिं अन्य राहत असे कोणेक, हो, सुंदरी;
ऐसें शंकुनियां गिरींद्रतनया ते तर्जनेतें करी
श्रीभूतें वलयप्रभासुरुचिरें त्या कंपयुक्ता करीं. १९.

तल्पा सन्निध आलिया निजपती, ग्रीवेसि जे फीरवी;
सप्रेमें हंसताहि वक्रहसितें शोभा कपोलीं धरी;
एणाक्षी धरितां करीं पुनति ते लाक्षारसें रंजिता;
प्रोष्ठीपादसमान कांति करि त्या दृष्टीहि विस्फारिता. २०.

एके हो शयनीं सरोजनयना त्या निद्रिता भावुनी,
एकीतेंहि पटावगुंठित अशी उत्कंधरें पाहुनी,
अन्येचेहि समीप येउनि बहुव्यालोलहस्तांगुली-
व्यापारीं वसनांचलासि हरुनी जागी प्रियेतें करी. २१.

अंतःकोपित कामिनीद्वय वरें पाहोनियां तें वनीं,
वेंचाया कुसुमांसि नम्रवदनें एकीस हो योजुनी,
अर्धोन्मीलितलोचनांकितमुखें जे शोभते चांगली,
स्मेरार्द्राधरपल्लवा नववधू ते अन्य आलिंगिली. २२.

धैर्याधैर्यपरिग्रहग्रहिल जा एणीदृशा त्यांचिये
प्रीतीला अतिकांतिरत्नयुग तें ठेवूनि हातीं, सये,
एकीच्या करिं घेववूनि पहिलें रत्ना, परेच्या प्रियें
हस्ताहस्तिमिषें स्पृशोनि कुच, तो स्वानद होय स्वयें. २३.

असे रेवाकुंज स्मरविपुलसेवाउचित तो;
तसा वारा वेलानवविदलदेलासुरभि तो;
तशी प्रावृड् धन्या नवजलदमालाकुल असे;
पराधीना चित्ता अघटित कराया सुख असें. २४.

श्वश्रू क्रोध करू, सुहृज्जन तसा विद्वेष हो आदरू,
निंदेलागिं करूत यातृ सकळा, त्या मंदिरा नादरूं;
ज्यामध्यें मुपकप्रहासि बहुधा उड्डीयमाना मला
मार्जारी स्वनखेंकरूनि करित्ये हे दुर्दशा आकळा. २५.

मल्लीतमालवननादितनीलकंठीं,
वल्लीविराजितवनीं भवनोपकंठीं,
पांथा, तुला उचित वास निदाघकाळीं.
गंगातटीं सदय होत असे कपाळी. २६.

दासासि जो भवननाथ वदे तटाकीं
हे तोडुनी बदरि तूं बहु दूर टाकीं.
हेमंतिं ऐकुनि असें हरिणायताक्षी
पाण्यांत टाकुनि कुठार सशंक लक्षी. २७.

जें जाहलें जाणच तें असोही. । होणार तें होइल सर्वथाही.
भातांहि जें होत असे, असो तें.। किमर्थ कोपश्रम व्यर्थ तूतें ! २८.

देती नीरकणांसि मेघ, पुरुवृष्टीस हो टाकुनी;
तैसे पर्वत शाड्वलांसि वमिती त्या नायकां सोडुनी;
त्रैलोक्यांत तरू फळें प्रसवती, त्या हो जनांवांचुनी;
भाल्या तूं रचिलेंसि कांय कुळटाप्रीतीसि हो सोडुनी. २९.

आला जई कुसुमचापसहाय चैत्र,
झाल्या लवंगलतिका सकळा विपत्र;
पाहोनि नीलकमलायतलोचनाली
ताळीदलद्युतिसि आंकळिते कपोलीं. ३०.

जांमाजि कोकिमिथुनें असती, कपोत
व्याधूतनूतनमहीरुहपल्लवांत,
तेथें अशीं प्रियवनें नसती किती हो,
टाकूनि खेद, सखि, चाल प्रियगृहा हो. ३१.

कर्णी रसाळधृतमंजरिच्या परागें
जे पिंजरीकृतकपोल प्रियानुरागें,
अश्रूमिषें वघुनि मौक्तिकवृष्टि अंकीं
राधा मुरारिमुख सादर तें विलोकी. ३२.

गोष्ठीं वसेहि पति तो बधिरा ननंद
भर्तार-भ्रातृ-युवती नयनांसि मंद
ऐसें वदोनि तरुणी कुच-कुंभसीमा
रोमांचकंचुकित दावि मनोभिरामा. ३३.

कांहीं कुंचित हार फार सरळ, भ्रू-वल्लि वक्रस्मितें,
हातें फाडुनि उत्पलेंहि युवती कर्णावतंसीकृतें,
गंडा खाजवि अंगुळी करुनियां सार्थक हो राहते,
ऐसी राज-कुमारिका सुकृतितें सव्याज तें पाहते. ३४.

देखोनी निजअंगणीं बहु धना देणार आला असें,
ते वक्षोज परस्परां क्रमिति हो एणी-दृशेचें तसें

आनंदाश्रुपयें हि कुंतळ तसे माळा-मिषें सोडिती,
दृष्टी त्या घनलाभ सांगत तशा कर्णीतिका भेटती. ३५.

न जाउनी पापिनिकेतनांतीं, । तूं गेलिशी कुंजवनांत दूतीं,
आंगीं तुझे किंशुक-भूषणाळी । हे अन्यथा दृष्टिपथा न आली. ३६.

तूझ्या प्रभू तनुसि भूषवि रत्नभूषा,
धन्या म्हणौनि सखि तूं निजवंश-भूषा
मत्कांत दृष्टि तनु अंतरिं भीतिभीत
भूषाविभूषित मला न धरी मनांत. ३७.

नेत्रासि कांत करितो कमलोपमान,
वाचा सुधारससमा करि साभिमान,
या कारणें सखि! मि काय करूं तयासी
माझें सहिष्णुपण दोष गमे मनासी. ३८.

स्वेदांबु-पूरित कृशोदरि! अंग कांहीं
कोठें सकंटक तुझें दिसतें तसेंहि,
अन्योसि पाहुनि विभूषविता प्रियानें,
कोठें तुझाहि पद ठेविल मान नेणें. ३९.

जो मी त्वरें करुनियां वदलों सपत्नी-
नामासि, तेथ भ्रमकारण जाण पत्नी,
हें अन्यथा जरि असे, शपथा करीन,
रोमादि-लक्षण महा-भुजगा धरीन. ४०.

पाहोनियां दयित-भाळिं अलक्त-रागा
पायांचिये सवतिच्या, युवती सरागा
ते दाखवी कमललोचन कोण कांती
आकर्ण-मुक्त शिखरोपम तीव्रकां ती. ४१.

दुःखा दीर्घतरा धरी, परि सखीसंगें न बोले घरीं
शैवाला-शयनीं कदापि न निजे (लज्जा धरी अंतरीं!)
कंठीं गद्गद शब्द होउनि, दृशे बाष्पोदका नादरी,
संतप्ता हृदयांत अंबुजमुखी जाणों मनोभूसखी. ४२.

सासूनें दिधलेंहि पद्मनयनप्रांतेंचि जे आकळी,
हस्त-स्पर्श कदापि त्यासि न करी जे मर्मेरा शंकली,
जावेच्या वचनीं सखीजन- मुखें प्रत्युत्तरातें करी,
विश्वासा धरिते हुताशन-समा जे अंतरीं सुंदरी ४३.

मुक्ता हार नवीन-अंबुजमयी माळाहि कांचीवरी
जातां तो प्रभु हो हरी युवतिचीं संप्राप्तितें तीं खरीं,
आणी मी सखि सांगतें धमनितें किंवा असे हा नसे,
जाणाया मग हेंचि कंकण करीं मूळासि हो जातसे. ४४.

विरह-विहित-गूढ-प्रेम जाणोनि कांतें,
पुनरपि फिरुनि येतां द्रव्य देईल मातें,
ह्मणुनि मरिच नेत्रीं घालुनी अश्रुधारा,
प्रतिदिन करि वेश्या द्वारदेशीं अपारा. ४५.

तें हेंचि वस्त्र, वलयें तरि तींच साचीं,
तैशीचि हे जघनिंची सखि रत्नकांची
भृंगस्वरें सकळ आजि वसंत-काळीं
तें भासतें अधिक सांग निदाघकाळीं. ४६.

हें काय हो कलशअंकित वक्ष आहे,
ऐसें पुसों पतिसि काय म्हणोनि पाहे,
प्राणेश तों युवतिच्या नयनांसि हातें
झांकी, त्वरें करुनियां करि विस्मितातें. ४७.

वक्षोज-चिन्हित उरस्थळ तें प्रियाचें
पाहोनियां, न करि निश्वसिता, न वाचे
प्रातर्जलें पुशितसे वदनासि कांता,
ते अश्र दूर करुनि कुटिलालकांता. ४८.

मार्गें पाहुनियां विपक्षवनितापादानुरागें तसें
आलिंगितानन, कामिनी नत-मुखी चित्रांपरी होतसे,
ते रूक्षा न वदे, न कोप नयनीं, विश्वास हो नादरी
प्रातर्मंगळ दाखवी करतळीं आदर्श तें सुंदरी. ४९.

पाहोनि कांत वलयांकित कंठदेशीं,
जे अन्य भीति न वदे परुषाक्षरासी
दूतीमुखीं हरिणकातरलोचनातें
दूराहुनी सजलसा धरि लोचनातें. ५०.

तूझा हा उर हा पयोधरभरें आक्रांत कोठें श्रमा,
दे माझें धन हो पुरा नियमिलें, राहो तुझी हे रमा,
ऐसें वारवधू सकंपहृदया कांतास हो बोलली,
त्याचें कंकण हातिचें धरुनि ते ओढावया लागली. ५१.

लज्जेनें समजाविना पतिसि जे रंभेपरी चांगली,
बोलेना सखि भीतशी किमपि जे अभ्यंतरीं कोपली,
येतां तो मलयानिल प्रकट हो शामा नवोढा घरीं,
शून्या त्या हृदया करूनि बसली ते काय सांगों परी? ५२.

सांगीतल्याविण नसे, सखि ! खेद-शांती
सांगावया हृदयिं लाज असे मला ती,
ऐसा अधोमुखि विचार करी, न सांगों
किंवा सखीस कलहाप्रति आजि सांगों? ५३.

नेत्रां किमर्थ धरिलें अरुणत्वभावा !
कां भर्त्छिलेंस करकोकनदस्वभावा?
केलासि कां कलह कोपवशें रुसून ?
दैवें वियुक्त हित टाकिति अर्थ सूज्ञे. ५४.

ज्यासाठीं गुरु तो लघू परि तशी गोष्टी कनिष्ठापरी,
गेलें धैर्यधनादि हो सहचरी ते नीति केली दुरी,
टाकूनी तृणवत्रपा करितसें गंगाहि त्रिदूपरी,
तो क्रोधें अवमानिला निजपती, हा बोल दैवावरी. ५५.

जें पंकेरुहलक्ष्म प्राणिकमळीं भाग्यालयीं जो गुरू
वेध्यानें लिहिलें ललाट-फलकीं जें भाग्य तैसें गुरू,
तें सारें सखि जो यथार्थ करितो त्याशीं प्रकोपक्रिया,
धिग्मातें, धिगजीविता, धिग तनू, धिक् चेष्टिता, धिग् वया. ५६.

आलीनें शपथें अनेक कपटें कुंजोदरीं आणिली
कां तें शून्य तयासि पाहुनि, मनीं विक्षोभ हो पावली;
ते ठेवी नयनांसि नीरजदृशा कुंजोपकंठीं वळें
भ्राम्यद्भृंग-कदंब-डंबर-चमत्कारानुरागच्छळें. ५७.

केलिगृहा येउनि शून्य पाहे,
एणीदृशा बहुत निःश्वसिताधरा हे,
अर्धाक्षरें वदत अर्धविलोचना हे
तांबूल अर्धच धरूनि तटस्थ पाहे! ५८.

कां तें शून्य निकुंज आणि कुटिला कामासि जाणोनियां,
दूतीला न निवेदितां सहचरी प्रश्नासि सांडूनियां,
शूलीन्! शंकर! चंद्रशेखर! हर! श्रीकंठ! शंभो! मला
संरक्षीं विरहानळांतिं म्हणुनी धांवा करी आपुला. ५९.

देऊनी चरणासि धैर्यभुजगीं, लज्जानदी लंघुनी,
अंगीकारुनि अंधकार पतिला तन्वी न पाहे वनीं,
संतप्ता घनगर्जिता चहुंकडे भीता असे लोचनीं,
क्रोध-क्रांत-कृतांतमत्त-महिष-भ्रांतित्व हो योजुनी. ६०.

त्या नाना रसिकांसि वंचन करी जे वारयोषा, वनीं
कोणैकें कपटेक-चाटु-वचनीं ते वंचिली कामिनी
यासाठीं हंसतो निकुंज चपळ-भृंगाक्षि-विक्षेपुनीं,
दंता दावितसेहि कोरक मिषें पुष्पच्छवी घेउनी. ६१.

अद्यापी पति तो नयेहि, बहुधा तो अन्य संगें असे,
ऐसें चिंतुनियां सलज्ज सखितें कांहीं न ते हो पुसे,
दीर्घा निश्वसिता नसोन चकिता न प्रेक्षणातें करी
कांहीं पक्व-पलांडु-पांडुर-रुची त्या हो कपोळीं धरी. ६२.

आणायासि न गेलि काय सखि ते? म्याला भुजंगासि तो?
किंवा रुद्र-निषेध-मापण-मिषें प्राणेश तो वर्ततो?
ऐसी कर्ण-सुवर्ण-केतकि-रजःपातोपघातच्छळें
अक्षींपासुनि अश्रु सोडि, परि हो चिंता तिची नांकळे. ६३.

आला केलि-निकुंज ! आणि सखि तूं, भो यूथिके ! शर्वरी !
मातें बंधु रसाळ ! तात तिमिरा ! मातें दया तूं करीं,
पृच्छा मी करितें घनाभ हरि तो कां येथ आला नसे ?
याचें कारण काय तें तुम्हि वदा अभ्यंतरीं जें दिसे. ६४.

स्नाना वारिदबिंदुहीं रचितसें, तो वास हो काननीं
सीतां चंदन बिंदुनीं मनसिजा देवासि आराधुनी,
नेली जागरणव्रतें च रजनी लज्जा दिली दक्षिणा
ऐसें मी तप आचरोनि न दिसे तो नाथ संरक्षणा ! ६५.

कैसा निकुंजांत नयेहि कांत । ऐसें मनीं चित्त असे नितांत,
कोणेक वेश्याहि धनाभिलाषें । अश्रूमिषें स्नान करी निमेषें. ६६.

मुक्ताहार करूनि गुंफित असे कांचीलते सुंदरी
दीपातें उजळी परंतु बहुला तैला न घाली वरी
ऐशी स्मेर-मुखी करूनि बहुधा कामानुरूप क्रिया
पाहे वासक यामिनीस दुरुनी कांतागमप्रक्रिया. ६७.

दावाया निज शिल्प कौतुकभरें कल्हार-हारा करी,
चित्रप्रेक्षणकैतवें करुनियां द्वारास ये सुंदरी,
घेऊनी नत भूषणा सहचरीभूषा जिकाया मिषें
ऐशी पाहुनि कामिनी स्मर असे स्मेरास्य-तोषा-मिषें ६८.

करी तनुविभूषणा, चिकुर धूपवी चांगली,
करी शयन-संनिध क्रमुकवीटिकाआवली,
करी हरिणलोचना भवन देहकांतीमुळें
वसत्कनककेतकद्युतिभरें दिना आगळें. ६९.

द्वैधाभाव असे पतीशिं मजशीं सर्वत्र अंगामुळें
या हेतूकरुनी वियोग मजला अभ्यंतरीं आकळे.
अद्वैता भजतां सितासि न घडे, अन्योन्यवीक्षा तशी,
स्वर्मी दुर्लभ भासतें म्हणुनियां चिंतीतसे मानसीं. ७०.

अश्रूतें निजवी छळें करुनियां दीपांकुरा पालवी,
संकेतासि करी कपोतनिनदें चेष्टा द्विजें दाखवी.

वारंवार कुशी वळे युवती ते भास्वत्स्तकपोलद्युती
तल्पासन्निधि कांतकाय म्हणुनि हस्तासि हो ठेवि ती. ७१.

"चोळी नीळनिचोळकर्पणिं, तसा चूडामणी चुंबनीं,
मी मागेन," म्हणे, "स्तनासि धरिता कांचील्ता काचनी."
ऐसीं चंदनचर्चितें मृगमदें अंगाधिवासा करी,
तन्वी वारवधू मनोरथपथें ते काय हो नादरी ? ७२.

मध्यातें कृशता, स्तनांसि गुरुता, देहासि सत्कांतता,
श्रोणीला पृथुता, गतीसि जडता, नेत्रांसि ते वक्रता,
लास्यातें दृढता, पटुत्व वचनीं, हास्यादिकीं स्फीतता,
हें कांहींच नसोनिया मजविणें कांतासि कां व्यग्रता ? ७३.

मी तों पतीशिं सुरतीं करितें नकारा,
नीवी करद्वयपुटें धरुनी विकारा
दावीं, तथापि पति पार्श्व धरूनि राहे
हें तो मनांत मज कौतुक फार आहे. ७४.

वक्त्राला, अधरासि आणि वचनीं, हास्यास, लास्यासही
कांतानें स्तविला म्हणोनि युवती त्या धन्य हा भासही
स्वप्नामाजि नये श्रुतीसि नयनीं अभ्यंतरीं भामिनीं
अन्यातें मजहून त्या प्रियतमा तो भेद कोठें मनीं. ७५.

स्त्रीया या असती सरोरुहदृशा केलिगृहाऽभ्यंतरीं,
ज्यांचा कंकणकुंडलध्वनि कदा निश्रांतिसी नादरी,
ऐसें तों असतां, सल्ये, पुरपथीं, सौधीं, सखीसंनिधीं
मी जातां प्रियदृष्टि ते मजविणें राहे न कोठें, कधी. ७६.

आहेत प्रतिमंदरीं मृगदृशा भास्वत्सुधासागरीं
त्या इंदीवरतुल्यलोचन अशा नानाविधा सुंदरी;
हें तों चित्र, विचित्रमन्मथकला वैदग्ध्य हेतोमुळें
तें चेतोहर वित्त देइ मजला, हें काय ते नाकळे. ७७.

आली दूतितडिल्लतासहचरी हे रात्र सांगातिणी;
तो दैवज्ञ पयोद सांगत असे प्रस्थानवेळा वनीं,

वाचा मांगलिकी वदेहि तिमिरस्तोमाख्य झिल्लीरवें
मुग्धे! हा अभिसारकाळ म्हणुनी टाकीं त्रपा लाघवें. ७८.

मार्गी त्या भुजगासि हो किमपि तूं म्यालीसना अंतरीं;
माझां संगमिं तूं पुनः प्रकटिसी कंपासि नानापरीं;
तैसा तो घनगर्जितें करुनियां संक्षोभ चित्तीं नसे,
माझे त्या वचनासि वक्रवदना होसी करूं कायसें? ७९.

जे फार स्फुरदुन्नतस्तनभरें आनम्र अंगें दिसे,
तेशी पादतलात्मकें किसलयें चालावया भीतसे;
ऐशी चंचललोचना शशिमुखी रात्रीं वनाअंतरीं
ते जाईल कशी मनोरथरथावांचूनियां, सुंदरी? ८०.

औत्कंठ्यें करुनीहि कांतविषयीं उद्युक्त ज्या कामिनी
कांतातें गमनासि, त्यांसि सखि ते आदित्य कादंबिनी
रात्री त्या दिन होति, अंधतम तें तेजापरी, काननें
तीं वेश्मांपरि, ते विमार्ग असती सन्मार्ग, पद्मानने

चंद्रोदयीं चंदनचर्चितांगी। हांसोनि चाले मदनकृशांगी
तैं काम कांताहृदया धरूनी। वेधीतसे कुंदशरें करूनी.

पद्मांसीं कुमुदांसि ज्यासि समता केव्हां नसे, हो,
त्यासीं स्वैरवधूविलोचन कसें तें तुल्य बोलें मु
सूर्याचा उदयीं प्रसन्न न दिसे, चंद्रोदयीं म्लानसे
पावे केवळ अंधकारसमयीं त्या हो विकासा

पल्लीच्या अधिपें सरोजवदना बोलाविता उत्सवीं
तेव्हां सद्मजनीं सहर्ष पुढती तें जाइजे, माधव
व्याजें राहुनियां सहर्ष गतजे केलीगृहीं दंपती
होती खिन्न कपोलकंठ धरुनी तो हर्ष सांगों

लोलचोल धरूनियां कारितसे कांचीलता झंकृति
न्यंचत्कंचुकबंध सुंदर तयीं वक्षोज दावी
रत्नाच्याहि विभूषणद्युतिभरें विद्युल्लता चालती
भासे वारवधू निकुंजसदनीं जातांहि ५

प्रस्थाना करिती त्वरेन वलयें, रक्तेंहि गेलीं, धृती
राहेना क्षणमात्र; चित्त पुढती दावीतसे हो गती;
जाया निश्चित कांत पाहुनि सर्व संप्रस्थितें तीं तशीं
जाणें; निश्चित जीविता प्रियसुहृत्सार्थासि का साडिसी? ८६.

प्राणेश्वरेंहि वदतां मग निर्गमातें
क्षामोदरी नतमुखी धरितेहि हातें.
आली त्वरेंकरुनि येउनिया निकुंजीं
उन्मत्तकोकिळरवें करि हो सुखें जी. ८७.

निःश्वास दीर्घ न करी वदताहि कातें
'जातों' म्हणोनि, रुदिता न करी कदा ते.
भालस्थलीं अलक धावुनि येति वेगें,
आयुर्लिपी पडुनि होति निराश मार्गे. ८८.

सोडीना विरहज्वरादिक तनुत्यागीं नतांगीस हो;
यासाठीं पुसतें तुला, यदुपती तें साग तूं सत्यहो.
ताम्बूलादि फुलें, पटीर, जल तें, जें बंधुंहीं दीधलें
अन्नत्यापरि काय तें परतरीं होतें विषाआगळें? ८९.

ठेवीलें पद सर्पमस्तकिं, गुरूभक्तीस, नीतीसही
सांडूनी, तुजसाठिं तें किति किती केलें नसे पापही?
अंगांत शत यातना, नयनिं त्या कोपक्रमा रौरवा
कर्मीपाक मनास युक्त, म्हणुनी जातां तुवां माधवा. ९०.

मुद्रेसि कात मज देइं तुझ्या वियोगें
हातातुनी वलय बाहिर जाय वेगें;
ऐसें वदोनि विगलन्नयनांबुधारा
वारांगना प्रिय-करांस धरी उदारा. ९१.

शय्येवरी पति कुचांकितवक्ष आला,
कांताप्रसन्नवचनामृततृप्त जाला,
सुभ्रू स्मितेंकरुनि अर्चितसे तयातें.
बाहोनियां रुचिरलोचनअंबुजातें. ९२.

वाचा मांगलिकी वदेहि तिमिरस्तोमास्य झिल्लीरवें
मुग्धे! हा अभिसारकाळ म्हणुनी टाकीं त्रपा लाघवें. ७८.

मार्गीं त्या भुजगासि हो किमपि तूं म्यालीसना अंतरीं;
माझ्या संगमिं तूं पुनः प्रकटिसी कंपासि नानापरी;
तैसा तो घनगर्जितें करुनियां संक्षोम चित्तीं नसे,
माझे त्या वचनासि वक्रवदना होसी करूं कायसें? ७९.

जे फार स्फुरदुत्तलस्तनभरें आनम्र अंगें दिसे,
तेशी पादतलात्मकें किसलयें चालावया भीतसे;
ऐशी चंचललोचना शशिमुखी रात्रीं वनाभंतरीं
ते जाईल कशी मनोरथरथावांचूनियां, सुंदरी? ८०.

औत्कंठ्यें करुनीहि कांतविषयीं उद्युक्त ज्या कामिनी
कांतातें गमनासि, त्यांसि सखि ते आदित्य कादंबिनी;
रात्री त्या दिन होति, अंधतम तें तेजापरी, काननें
तीं वेश्मांपरि, ते विमार्ग असती सन्मार्ग, पद्मानने! ८१.

चंद्रोदयीं चंदनचर्चितांगी। हांसोनि चाले मदनकृशांगी
तें काम कांताहृदया धरूनी। वेधीतसे कुंदशरेंकरूनी. ८२.

पद्मांसीं कुमुदांसिं ज्यासि समता केव्हां नसे, हो, सुखें,
त्यासीं स्वैरवधूविलोचन कसें तें तुल्य बोलों मुखें?
सूर्याचां उदयीं प्रसन्न न दिसे, चंद्रोदयीं म्लानसें,
पावे केवळ अंधकारसमयीं त्या हो विकासा तसें. ८३.

पल्लीच्या अधिपें सरोजवदना बोलावितां उत्सवीं
तेव्हां सद्मजनीं सहर्ष पुढती तें जाइजे माधवीं;
व्याजें राहुनियां सहर्ष गतजें केळीगृहीं दंपती
होती खिन्न कपोलकंठ धरुनी तो हर्ष सांगों किती? ८४.

लोलचोल धरूनियां करितसे कांचीलता झंकृति,
न्यंचत्कंचुकबंध सुंदर तयीं वक्षोज दावी गती;
रत्नांच्याहि विभूषणद्युतिभरें विद्युल्लता चालती
भासे वारवधू निकुंजसदनीं जातांहि धन्याप्रती. ८५.

प्रस्थाना करिती त्वरेन वलयें, रक्तेंहि गेलीं, धृती
राहेना क्षणमात्र, चित्त पुढती दावीतसे हो गती,
जाया निश्चित कांत पाहुनि सर्वे सप्रस्थितें तीं तशीं ।
जाणें, निश्चित जीविता प्रियसुहृत्सार्थासि का सांडिसी ? ८६.

प्राणेश्वरेंहि वदता मग निर्गमातें
क्षामादरी नतमुखी धरितेहि हातें.
आली त्वरेंकरुनि येउनिया निकुंजीं
उन्मत्तकोकिलरवें करि हो सुखें जी. ८७.

निःश्वास दीर्घ न करी वदताहि कांतें
'जातों' म्हणोनि रडिता न करी कदा ते.
भालस्थळीं अलक धावुनि येति वेगें,
आयुर्लिपी पढुनि होति निराश मागें ८८.

सोडीना विरहज्वरादिक तनुलागीं नतांगीस हो,
यासाठीं पुसतें तुला, यदुपती तें सांग तू सत्यहो.
तांबूलादि फुलें, पटीर, जळ तें, जे वधुहीं दीधलें
अन्त्यापरि काय तें परतरीं होतें विषाआगळें ? ८९.

ठेवीलें पद सर्पमस्तकिं, गुरूभक्तीस, नीतीसही
सांडूनी, तुजसाठिं तें किति किती केलें नसे पापही ?
अंगांत शत यातना, नयनिं त्या कोपक्रमा रौरवा ।।
कर्मीपाक मनास युक्त, म्हणुनी जातों तुवा माधवा ९०.

सुंदरीस कांत मज देह तुझ्या वियोगें
हातातुनी वलय बाहिर जाय वेगें,
ऐसें वदोनि विगलन्नयनाम्बुधारा
वारांगना प्रिय-करांस धरी उदारा. ९१.

शय्येवरी पति कुचांकितवक्ष आला,
कांताप्रसन्नवचनामृततृप्त जाला,
सुभ्रू स्मितेंकरुनि अर्चितसे तयातें.
वाहोनियां रुचिरलोचनअंबुजातें. ९२.

कांतानें अपराध तो करुनियां देतां कुचांतें करा,
ग्रीवा वक्र करूनि सोडित असे क्रूरां कटाक्षांकुरां;
सप्रेमें वदतां हँसोनि वचनें प्रीतीसि मानापरी
दात्री कल्पलतेसमानकरुनी कांतास हो सुंदरी. ९३.

प्रस्थानीं कारितो तुझेहि कमलच्छाया मुखेंदूवरी,
श्रीखंडद्रव शीत शिंपित असे सप्रेम मार्गांतरीं,
ऐशाही पतिसीं कशी तुज नसे ते प्रीति हो मानसीं?
रक्तक्रांतसरोजतुल्यनयने तूं मागुती कोपशी. ९४.

कनकमहीधरसन्निभस्तनांते
सखि लिहित्ये प्रियपाणिपल्लवांतें.
हँसुनि म्हणे मकरी वरी मुखातें,
कमलमुखी मग वारित्ये सुखातें. (सखीतें?) ९५.

सांद्रा शब्दीं मुखरितदशा मेघपंक्ती करिती,
धारासारें धरणिनल्या सेचना आदरीती,
त्या हेतूनें सखि तुजवरी स्नेहपुरा करीत्ये,
नाथ, स्नेहा न धरिशि मनीं, पावल्ये विस्मयातें ९६.

आनंदयुक्त वनमालिविलोकनाला
कुंजासि जा करुनि काय विचारणेला?
गाणार हो मधुप मत्त, चकोरजाती
तेथें अपार फिरती दिवसांत राती. ९७.

" भिंतीवरी लिखित हो अवतारमूर्ता,
त्यामाजि सत्तम वदे मज पुण्यकीर्ता."
ऐसें सखीवचन ऐकुनि तत्क्षणीं ते
सीता स्मितेंकरुनि दे मग उत्तरातें. ९८

सङ्केतकरूनि सखिशीं न वदेसि साचे,
ऐसें हँसोनि वदतां मुरवैरि वाचे;
दतार्णकरुनि दुःखित विंबभागा,
राधा विनम्रवदना करित्ये सुरागा. ९९.

तें तो वारि कसेंहि दिव्यतुजळीं गंगाधरातें असे,
तो वन्ही मग दिव्यलोचन असे, तो सर्प-भूषा दिसे,
तस्मात् द्यूत-विधींत तूंचि हारिल्या हारासि दे लौकरी.
ऐसी शैलसुता हंसोनि वदली शंभुसि नानापरी. १००.

आली समीप रजनी, तम गाढ होतें,
तो कामदेव हृदयीं धरितो सुखातें,
तूं जें मशीं रुचिर बोलशि, तें न टाकीं,
त्यातें मनीं धरुनि विस्मृतिलागि टाकीं. १.

धात्यानें रचिली प्रदीप-कलिका राधा-धरा-मंडलीं
तीची दैववशें करूनि चरमा ते हो दशा पातली
यासाठीं नत होउनी तुज वदों श्रीरंग नानापरी,
स्नेहातें करुनी निलोक न करीं हें अंधकारापरी. २.

तूं पीयूष मयूख ! सोडिं शिशिर-स्निग्धा-सुधासीकरा,
तूं भोगींद्र ! फणेन वीजन करीं, साडीं निळंच त्वरा,
तूं गंगे ! करिं सिंच शीतळ जळें अंगें शिरीं प्रेमें,
हे तो शैलसुता कठोरकिरणक्लांता मनीं हो गमे. ३.

पृथ्वी ! कोमळ होईं तूं; दिनमणी ! तूं शैत्य तें आदरीं,
तूं मार्गीं लघुता धरीं, पवन ! तूं खेदादि घालीं दुरी,
सान्निध्या करिं दंडकावन ! गिरी ! तूं मार्ग टाकीं दुरी,
सीता तें विपिनासि हो मजसवें हे पावपातें करी. ४.

हें तों पुढें दिसतसे शत कामिनींचें,
कोठें निवेशन करूं नयन-द्वयाचें,
ऐसें विचारुनि मनीं नयनां मिटूनी,
राहे हरी पुलकयुक्त तनू धरूनी. ५.

जो हार दृढबद्ध पाणिकमळीं द्वारांत जो वारिला
तो सुता मग मी म्हणोनि पुनती भीतापरी पातला,
तत्पासंनिधि हेमकंकण करें ते मुक्त हो पाहतां,
पार्श्वी सुख तसाच धृष्ट सखि मी तो देखिला वारितां. ६.

माळा मस्तकिं ते धरूनि, करुनी भालांत पत्रावळी,
केयूरांसि भुजाकरीं, कुचयुगीं ठेवूनि मुक्तावळी,
विश्वासा मृगलोचने उपजवी कांची-निवेश-स्थळें,
नीवीग्रंथि हरीतसे मृदुकरें ते कामिनी आकळे. ७.

शंकाशृंखलबद्ध त्याहि नयन प्रांतें न पाहे बरें,
केयूरध्वनि फार भीत न करी आलिंगना आदरें,
दंतांतेंहि न लावितां हळु हळू बिंबाधरा पीतसे,
जेथें हो रणितादि कांहिंच नमे संभोग तो कायसें ? ८.

ज्यामाजि दाम-कलकूजित नाभि पाहे,
पारावत ध्वनि-विचित्रित कंधरा हे,
उद्भ्रांतलोचनचकोर अनंग-रंगा
त्या इच्छितों हृदयीं वारवधूप्रसंगा, ९.

नेत्र-प्रांत विलोकुनी युवतिच्या शोणारविंदापरी,
जल्पातें न करी, स्मितासि न धरी, चीटीस टांकी दुरी,
त्रपा-सन्निधि भीत येइ पुलकभ्राजत्कपोलद्युति,
ग्रीवा नम्र करूनि गुंफित असे मुक्तावळी त्या किती. ११०.

हास्यें वर्जित आस्य यद्यपि तसें त्रास्याविणें बोलणें
नेत्रें कोकनदापरी तदपि तूं कोठें तरी राहणें,
माळा गुंफितसे सखी मकरिका लेखा कुचातें करी
धूपें कुंतल सावरी अशि दिसे सायंतना सुंदरी. ११.

लज्जा जयासि हृदयांत नसेहि कांहीं,
तो भीतिलेश न दिसे, करुणा न पाहीं,
त्याचे करीं बकुल-कुड्मलकोमळेतें
पातें न देउनि फारि सखि ये कळेतें. १२.

तूं बाहेर सुधा-समान वदसी, वज्रापरी अंतरीं,
हें ऐकोनि सकोपकांतकपटप्रस्थान तें आदरी,
पाहेना, न वदे, मुखासि फिरवी, प्राणेश तो त्यांवरी
दृष्टी त्यां कृपणा धरुनि युवती ते रोदनातें करी. १३.

तेव्हां तमोजटिल तीं हरिदंतराळें,
कांहीं निशीशि निघतां दिसती कराळें,
तेव्हां नदीनिकट त्याहि वनांत, कांते,
तो कोण, सुंदरि, करील सहाय तूतें ? ११४.

तो कांत हो कनकजंबिर तें धरूनी
हातामध्यें फिरवी सूचन तें करूनी,
भिंतीवरी लिखित मानुस आदरानें
बिंदूस इंदुवदना करिते करानें. ११५.

रंभा ऊरू, नयन कमळें, शैवळें केश झाले,
जीचें चंद्रापरि वदन तें, मध्य भासे मृणाळें,
नाभी कूपापरि, करयुगीं पल्लवा आदरीते,
ऐशी कांता हृदयिं धरितां तापवार्ता सुरे ते. ११६.

जातां सखी सलिलकेलिकुतूहलातें
गेलों तिचे निकट मी करुनीं मिषातें,
तेव्हां स्मितद्युतिचमत्कृतहक्तरंगें
अंगीकृता स्मरतसे विविध प्रसंगें. ११७.

जे हो कदापि न करी सुटतां निचोल,
तैसा नकार न वदे नयना सलोल,
हास्या करी प्रकट वारवधू उदारा,
तीचा विनोद हृदयीं स्मरतोहि सारा. ११८.

शून्या हो सदनीं अनेक रचिल्या भंगी वनीं निर्जनीं,
पुष्पांचें मिष मी करुनि गतहो दृष्टीस विस्फारुनी,
तांबूलाहरणच्छलें करुनियां त्या हो कुचा दावुनी
नीतातें करिते क्षुधा तदपि तो नेणे मनीं मानिनी. ११९.

सांडी कोपविधी, वदेंहि करुणावाक्यें सुधाशीतळें,
नेणे या धरणीतळांत सकळा आमोद तो आकळे,
तें राहो, प्रियदर्शनोत्सुक तुझे ते नेत्र हो ज्यावरी
कोपातें करिते तयासि नमितो धन्यापरी सुंदरी. १२०.

आला हो कुमुदेश्वर प्रकट तो सर्वेशवायू तसा,
स्फूर्जद्भृंगसमीपभैरव असे प्राणेश तोही तसा,
हें तो सिद्धरसादि मन्मथमहावैद्यापुढें, सुंदरी!
मानव्याधि तुझा, कृशोदरि! कसा राहेल चित्तांतरीं? २१.

ते चंद्रसुंदरमुखी मग नंदसूनू
दैवें निकुंजभवनागत मध्य भानू,
याअंतरीं सहचरी करुनी पुटाला
पानीय पान-कपटें ऱ्हद आटपीला. २२.

आणूनि नीरजमुखी शयनोपकंठीं
सोडीतसें हृदयबंध धरूनि कंठीं,
याअंतरीं बहुत कुक्कुटनाद केला,
त्या हो विदूपकवरें; मज हास झाला. २३.

स्तब्धा हो चरणीं, धरी स्तनतटी स्वेदासि, रोमांचिता
अंगीं, जे स्वरभंगचाटुवचनीं, बिंबाधरीं कंपिता,
वैवर्ण्यासि धरी कपोलफलकीं, अश्रू तसे लोचनीं,
लीना जे स्वमनीं क्षणेंकरुनियां श्रीकृष्णसंदर्शनीं. २४.

पाहे विलोलजलदादिक अंतरिक्षीं,
चंद्रस्रवें कलरवेंहि कपोत लक्षी,
मंदाकिनी दिसतसे गळतीहि तारा,
आनंद फार विपरीत-रतीं, उदारा. २५.

व्योमीं येतां नवजलधरा त्वत्पथातें पहाया
आले कंठीं सकळ असु ते कामिणीचे हराया,
आणी संगें सदय तुझिया वक्त्रचंद्रा पहाया
तीच्या पक्षें बहुत बिसिनीपक्ष केले सहाया. २६.

त्या कामिनीसुतनुलक्षणसागरातें
हें चित्त आणि नयनादि बुडोनि जातें;
ऐसें असोनि गुरु चित्त जडोनि राहे,
हें तों लघू फिरतसे नयनादि पाहें. २७.

म्यां तो असे आजि विधेय कांहीं । कुंजोपकंठीं कलनाद पाहीं
राधावसंतभ्रमसादरातें । करील नेत्रोत्पलतोरणातें. २८.

पाहे लक्ष्मण दुःखदीर्घ, परि, तो कांहीं व्यथा नादरी,
निःश्वासा न धरी, कदापि नयनीं अश्रुलवा नादरी,
प्रातर्वाततिवर्तमानदहनक्रूरें अनंगज्वरें.
झाला हो कृश राम चिंतित असे सीता बहू आसरे. २९.

तो स्पर्श हो, स्तनतटीसि धरूनि राहे,
तें हो निरीक्षण गमे, सखिलागिं पाहे,
जेथें कृशोदरिकथाहि विनोद राहे,
तो येक हो समय मी हृदयांत पाहें. १३०.

हा तों विधूगरळपादपकंद आहे,
हस्तीं वसंत-करुणा-नलिनी न पाहे,
हे तों निशा स्मर-महीपतिची कृपाणी,
यानंतरें करुं मि कायहि चक्रपाणी. ३१.

चक्षु प्रियाविण कदापि, सखी, न पाहे,
हें चित्त कांतविरहें न कदापि राहे,
प्राणेशअन्यचरणा न शिवेहि पाणी,
हा आजि हो करिल काय? वदे हि वाणी. ३२.

पाहोनि प्रतिबिंबिताहि विधुला कांतेंजळाअंतरीं
हें कांतामुख हो म्हणोनि रचिला तो हास नानापरी;
तें कांहीं न वदे म्हणोनि तिचिया मानास आशंकुनी,
हस्तें स्पर्श करी पतीपुळकितें नानापरी, नामिनी. ३३.

हें कांतामुख अद्वितीय म्हणुनी मूवर्ग टाकी दुरी,
रे चंद्रा! मदना! दृगंबुज तिचें पाहोनि तें अंतरीं
झंकारा धरिशी वृथा भ्रमर तूं, तन्वी नसे तादृशी,
कर्मातें धिगहो-तुळान पुनती लक्ष्या असे ईदृशी. ३४.

कोदंडा, विशिखा, मनों नियसती कामापरी चांगली,
भ्रूवल्ली, नयनांचळा, पतिमनीं संवास तो आकळी
ऐशी हो कुसुमायुधें सम असे, स्वामी ल्पे तें करी,
तन्वी होउनि हे अनंगविभवा जैशी कदा नादरी. ३५.

पाणी कंकणशब्दशून्य, कुच तो निःकंप वस्त्रा धरी,
दृष्टी निश्चळ, कुंडलें न धरिती तें नृत्य नाना परी,
तैं चित्रार्पित मूर्तिशीं कृश तनू तो भेद कांहीं नसे,
त्वन्नामस्मरणेंकरूनि पुलकारभक्रिया जैं नसे. ३६.

मुक्ताहारा कुचागिरिवरी, हातिंच्या कंकणातें,
कर्णस्वर्णाभरणहि तसें सांडुनी पैंजणातें,
आजि स्वर्मी बकुलकलिकाभूषणातें धरूनी,
कोणे चोरें हृदय हरिलें नाकळे तें स्मरोनी. ३७.

नीवी हरील, नख लाविल तें कुचातें,
दंतच्छदांसहि डसेल धरूनि हातें,
ऐशा परीं विलिखिता दयितासि बाला
पाहोनि शंकत असेहि विहारकाळा. ३८.

चेतश्चंचलता त्यजीं, प्रियसखि! व्रीडे! न पीडा करीं,
सांडीं, बंधु! निमेष, लोचनयुगा, कामा! क्षमेतें धरीं;
बर्ही मूर्धनि, कर्णि जो कुवलया, वंशी करानें धरी,
तो हा सुंदर कृष्ण लोचनपंथीं राहो अनेकापरी. ३९.

---

जे भानुमिश्रकविनें रचिली उदारा
हे मंजरी, तिजवरी करुनी विचारा
नानाप्रधानवचनें रचिली कवीनें
श्रीभैरवें सुगमअर्थपदें नवीनें. १४०.

---

## गर्भगीता.

गणेशं शारदां चैव गुरुं संतं नमाम्यहम् ।
तेषां प्रसादेन निर्विघ्नं श्लोकार्थश्च प्रकाशितः ॥ १ ॥

जय जय गजवदना । नरदेह मूषकवाहना
कंठीं मिरवे नागबंधना । सरळ सोंड एकदंतु. १.

भावें स्मरतां श्रीगणेशु । प्रसन्नत्वें दावी प्रकाशु.
ज्ञानामृतउल्हासु । देता होय. २.

सावरी नमिली ते सारजा भवानी । जियेतें वंदिती सुर, ऋषी, मुनी,
वेदगर्भा, अमृतसंजीवनी, । वागीश्वरी, विश्वमाता. ३.

स्तवन करितां तुष्टली । जैंवि कामधेनु यो रसें बोळली
जिव्हा आपणचि जाहली । मंथार्थ बोलविती. ४.

सर्वेचि वंदिजे श्रीगुरु । जेणें मस्तकीं ठेविला अभयकरु,
तो पूर्ण भास्करु । गुरुमूर्ति. ५.

संत, सज्जन आणि श्रोतां । आणिक न देखिजे गुरुपरता
स्वयें आपणचि वक्ता । काव्यरस. ६.

वंदिजे कवीश्वर महाभाव । वाल्मीक, पराशर, वामदेव,
व्यास, वशिष्ठ, शुकदेव । हे कवित्ववाक्यें साहाकारी. ७.

यांच्यांनि वाक्यसाहाकारें । गर्भगीतार्थ निर्धारें
श्लोकार्थ प्राकृत उत्तरें । बोलिजत असे. ८.

तें परिसतां ज्ञानाचें महिमान । सुख पावती संतसज्जन
मुमुक्षु प्रविष्टति ज्ञान । श्रवणमात्रें. ९.

भारतामध्यें भगवद्गीता । त्याचे मथिनींची हे गर्भगीता
श्रीकृष्णदेवें बोलिली पार्था । तेचि व्यासें विस्तारिली.

येथोनि तो श्लोकारंभु केला, । अर्जुन देवासि पुसता जाला
तेथेंचि कथेचा प्रारंभु केला । टीकेकारणें. ११

अर्जुन उवाच.

पार्थु म्हणे गर्भवास, जरा, मरण । प्राणियांसि व्हावया काय कारण ?
हें चुकवावया प्रयत्न । काय ? तो सांगें, जनार्दना ! १२.

भगवानुवाच.

देव म्हणे हे मानव अज्ञानी । देखदेखतां पडले संसारबंधनीं,
आशामोहें गुंतले प्राणी । शरीरा आणि संपत्तीशी. १३.

अर्जुन उवाच.

अर्जुन म्हणे श्रीपती ! । आशा, मोहें बंधनीं पडती,
कोणे प्रकारें हे चुकती । तें सांगिजो जी. १४.

देवो म्हणे, जे आशा, मोहो संडिती । निस्पृहतेंत वर्तती
निष्कर्म कर्मचि देखती । ते कर्मबंधना वेगळे जाण्पा. १५.

अर्जुन उवाच.

धनंजयो म्हणे गा श्रीहरी ! । काम, क्रोध, मोहो या शरीरीं
मनीं मोहो धरूनी निरंतरीं । कैसियापरी तें कर्म चुकेल ? १६.

भगवानुवाच.

श्रीहरि म्हणति ब्रह्मासीं पाहीं । प्राणियां कर्मीं न लिंपे कांहीं
मन होय निर्मळ देहीं । त्यासि पुनर्जन्म नाहीं. १७.

## अर्जुन उवाच.

अर्जुन बोले वचनीं । अशुचिशुचिव्रतें आचरोनी
सकल्पविकल्प धरी मनीं । तरी कैसेपरी कर्म नाशेल. १८.

## भगवानुवाच.

गोविंद म्हणति श्रीगुरुचिंतनीं घसती । सर्वज्ञ कर्मापासोनि मुक्त होती,
सकल्पविकल्प तत्वता नाशती । मग पुनर्जन्म कैंचे. १९.

नाना शास्त्र वेदाभ्यास करी, । नाना देवांसी पुजी जन्हीं,
आत्मज्ञानेंविण भक्ति करी । त्याचें सर्व कर्म निष्फळ. २०.

अनेक क्रियेतें आपदोनी । दान देती सुवर्ण आणि मेदिनी,
पारी आत्मज्ञानावांचूनि । मुक्ति नाहीं सर्वथा. २१.

कोटी यज्ञ आचरला । गज गोदानें, अश्वशाळा
आत्मज्ञानीं अतरला । श्रीगुरुप्रसादेंविण मुक्ति नाहीं. २२.

नाना आचारें शुचि । जटा वाढवी, केश डोइशी,
कर्म, धर्म, इंद्रियें शुची । पारी मोक्ष नाहीं आत्मज्ञानेंविण. २३.

ध्यानधारणीं तत्पर, । मनोनिग्रहीं निर्धार,
देहदंडणीं नेघे आहार, । कदाहारें मोक्ष नाहीं सर्वथा. २४.

करी तीर्थयात्रा, भूप्रदक्षिण, । त्रिकाळस्नान, भस्मलेपन,
वल्कलें आणि चर्मपरिधान, । आत्मज्ञानेंविण मोक्ष नाहीं. २५.

नेमेसी केलिया यज्ञाच्या कोटी, । देव पूजिताहे कठीं,
सेवी वनें उपवनें दरकुटी । आत्मज्ञानेंविण मोक्ष नाहीं. २६.

नग्न असोनि वाचा मौन धरी, । पंचाग्निसाधनें देहदंडन करी
गीत, वाद्य, नृत्य करी परी । तत्वज्ञानेंविण मोक्ष नाहीं. २७.

हे समस्त बुद्धि मज्ञानिकार । जव तत्वज्ञानीं नाहीं निर्धार,
आत्मज्ञानें बुद्धि नव्हता स्थिर, । तव चित्तासि विश्रांति न घडे २८.

श्रीगुरुप्रसादें अभ्यंतर निर्मळ जालें, । देहेंद्रियांसी जिंतिलें,
त्यांणें मन शुद्धत्व पावलें । काटी तयें काय कारण, २९.

अर्जुन उवाच.

अर्जुन म्हणे, अभ्यंतर होय शुद्ध कैसें ? । मनासी सदा अज्ञानाविसें
तो मळ कैसेयानीं निरसे ? । तो उपावो सांगें कृष्णाजी. ३०.

भगवानुवाच.

देव म्हणती गा पाडवा । श्रीगुरुवाक्य मनीं धरावा,
ज्ञानाग्नि अखड चेतवावा । तरी जन्म बंधनापासोनि वेगळा होय. ३१.

अर्जुन उवाच.

अर्जुन म्हणे देवा परियेसीं । कर्माकर्म हीं दोनीं बीजें प्राणियांसि
या बंधनावेगळा कोणें प्रकारेसी । होइजे तें सांगावें. ३२.

भगवानुवाच.

तव देव म्हणे परियेसीं । ज्ञानयोगें सर्व कर्माकर्म होय आपेसीं
योगाभ्यासें शुद्धकरीं आत्मयासी । तेणें अबीज होये. ३३.

ऐसा जो योगी सहजानदु । तयासी नाहीं जन्ममृत्यूचा संबधु
तयासी नाटेव विधिनिषेधु । तो योगी अबीज जाला. ३४.

हे गर्भगीता गीतेचें सार । प्रत्यक्ष मोक्षमंदिर
गुह्याचें गुह्य साचार । तुज सांगितलें ३५.

हा गर्भगीतार्थ संपूर्ण । श्लोकार्थ प्राकृतवचन
आनंदनदनें केलें कथन । श्रीगुरु प्रसादें. ३६.

गर्भगीता संपूर्णास्तु । आत्मतत्वनिरूपणं नाम प्रथमोऽध्याय. ।

श्रीगुरुप्रसादें अभ्यंतर निर्मळ जालें, । देहेंद्रियासी जितिलें,
त्याणें मन शुद्धत्व पावलें । काटी तयें काय कारण, २९.

अर्जुन उवाच.

अर्जुन म्हणे, अभ्यंतर होय शुद्ध कैसें ? । मनासी सदा अज्ञानापिसें
तो मळ कैसेयानीं निरसे ? । तो उपावो सांगें कृष्णाजी. ३०.

भगवानुवाच.

देव म्हणती गा पाडवा । श्रीगुरुवाक्य मनीं धरावा,
ज्ञानाग्नि अखड चेतवावा । तरीं जन्म बधनापासोनि वेगळा होय. ३१.

अर्जुन उवाच.

अर्जुन म्हणे देवा परियेसीं । कर्माकर्म हीं दोनीं बीजें प्राणियांसि
या बधनावेगळा कोणें प्रकारेसी । होइजे तें सांगावें. ३२.

भगवानुवाच.

तत्र देव म्हणे परियेसीं । ज्ञानयोगें सर्व कर्माकर्म होय आपेसी
योगाभ्यासें शुद्धकरीं आत्मयासी । तेणें अबीज होये. ३३.

ऐसा जो योगी सहजानदु । तयासी नाहीं जन्ममृत्यूचा सबधु
तयासी नाठवे विधिनिषेधु । तो योगी अबीज जाला. ३४.

हे गर्भगीता गीतेचें सार । प्रत्यक्ष मोक्षमदिर
गुह्याचें गुह्य साचार । तुज सांगितलें ३५.

हा गर्भगीतार्थ सपूर्ण । श्लोकार्थ प्राकृतवचन
आनदनदनें केलें कथन । श्रीगुरु प्रसादें. ३६.

गर्भगीता संपूर्णास्तु । आत्मतत्वनिरूपणं नाम प्रथमोऽध्याय ।

---